# नवभारत

वर्ष ८ वें ] जानेवारी १९५५ [ अंक ४ था



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# संपादकीय

## ‘नवभारत’ निधीकरितां विनंति

या अंकांत शेवटीं ‘नवभारत’निधीकरितां काढलेलें विनंतिपत्रक आढळून येईल. या विनंतिपत्रकांत ‘नव-भारता’नें केलेल्या कार्याचा स्थूल आढावा घेतला असून, त्याच्या वैशिष्ट्यपूर्ण ध्येय-धोरणाचाहि निर्देश करण्यांत आला आहे. ‘नवभारता’सारख्या ध्येय-धोरणानें चाललेल्या मासिकाची संपूर्ण महाराष्ट्राच्या दृष्टीनें किती आवश्यकता आहे याचेंहि दिग्दर्शन विनंतिपत्रकांत करण्यांत आलें आहे. गेलीं ७ वर्षे आपलें कार्य करीत असतांना ‘नवभारता’ला जी आर्थिक झीज सोसावी लागली तिचा पत्रकांत उल्लेख असून ‘नवभारत’ मासिक आणखी दहा वर्षे तरी जग-विण्याकरितां येत्या डिसेंबर १९५५ अखेरीपर्यंत निदान पन्नास हजार रुपयांचा निधि जमा व्हावा या हेतूनें ‘नवभारता’स साहाय्य करण्याबद्दल ‘नवभारता’च्या हितचिंतकांस प्रार्थना करण्यांत आली आहे. या विनंतिपत्राला महाराष्ट्रांतील निरनिराळ्या क्षेत्रांतील विचारवंत कार्यकर्त्यांनी पाठिंबा दिला आहे हें विनंतिपत्राखालीं असलेल्या नांवांवरून दिसून येईल.

‘नवभारता’च्या वाचकांस आमची कळकळीची विनंति कीं त्यांनीं या विनंतिपत्रकांतील प्रार्थनेनुसार ‘नवभारता’स स्वतः साहाय्य करावें, इतरांच्या निदर्शनास हें विनंतिपत्रक आणून त्यांचें साहाय्य मिळवून द्यावें आणि अशा रीतीनें विनंतिपत्रकांतील संकल्प पुरा करण्यास मदत करावी.

## ‘नवभारता’चा आगामी ‘भूदानविशेषांक’

येत्या १९५५ जानेवारी २८ तारखेस श्री. शंकरराव देव यांच्या वयास ६० वर्षे पूर्ण होत आहेत. श्री. शंकरराव देव यांनीं भारताची व महाराष्ट्राची आजवर केलेली दीर्घकालीन सेवा, त्यांचा ‘नवभारत’ मासिकाशीं असलेला अत्यंत जिव्हाळ्याचा संबंध हीं लक्षांत घेऊन, ‘नवभारत’ मासिकाचा एक विशेषांक त्या निमित्तानें व त्या दिवशीं प्रसिद्ध करावा व अलीकडे श्री. शंकरराव देव यांनीं ज्या भूदानकार्याला निरलसपणें वाहून घेतलें आहे तें ध्यानांत घेऊन हा विशेषांक ‘भूदान-विशेषांक’ म्हणून प्रसिद्ध करावा असें योजिलें आहे. म. गांधींच्या निर्वाणानंतर, सर्वोदयाच्या क्षेत्रांत आचार्य विनोबा यांच्या प्रेरणेनें भूदानाच्या रूपानें एक क्रान्तिकारक विचार अवतीर्ण झाला असून तो गेल्या तीन वर्षांत इतका प्रभावी झाला आहे कीं सामाजिक, तात्त्विक, आर्थिक क्षेत्रांतील प्रमुख विचारवंतांचें व कार्यकर्त्यांचें त्यानें लक्ष वेधून घेतलें आहे. भूदान-आंदोलनाचें किंवा (विनोबांनीं आंदोलनाच्याऐवजीं जो ‘आरोहण’ शब्द सुचविला आहे तो विचारांत घेतां) भूदान-आरोहणाचें हें सामाजिक महत्त्व लक्षांत घेऊन ‘नवभारता’च्या नियोजित भूदान-विशेषांकांत ‘भूदान-आरोहणा’चा निरनिराळ्या बाजूंनीं विचार करणारे लेख द्यावयाचें योजिलें आहे. राजकीय पक्ष व भूदान, सर्वोदयाचा आर्थिक कार्यक्रम व भूदान, सत्याग्रह आणि भूदान, शेतीची सुधारणा आणि भूदान, खाजगी मालकीची कल्पना आणि भूदान, भूदानमूलक ग्रामोद्योगप्रधान अहिंसक समाजक्रान्ति, प्राचीन यज्ञदान-कल्पना व भूदान, जमीनसुधारणा व भूदान इत्यादि विषयांवर श्री. जयप्रकाश नारायण, श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे, श्री. वैकुंठलाल मेहता, श्री. रा. कृ. पाटील, आचार्य शं. द. जावडेकर, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. एस्. एम्. जोशी, श्री. ना. ग. गोरे, श्री. र. के. खाडिलकर, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. ना. अ. मावळंकर, प्रा. वि. कानेटकर, श्री. भाऊ धर्माधिकारी, श्री. दि. के. बेडेकर, प्रा. दे. अ. दाभोलकर, प्रा. दे. ज. हातेकर, प्रा. ठाकुरदास बंग इत्यादींनीं लेख देण्याचें मान्य केलें आहे. भूदानासारख्या महत्त्वपूर्ण विषयावरील विचारवंत कार्यकर्त्यांचे लेख सादर करणाऱ्या आगामी ‘भूदानविशेषांका’चें वाचक स्वागत करतील असा दृढ विश्वास वाटतो.

— कार्यकारी संपादक

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष आठवें
अंक चौथा

# नवभारत

जानेवारी
१९५५

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत–श्री. हरि कृष्ण मोहनी–प्रा. गोवर्धन पारीख
प्रा. वि. म. बेडेकर का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
९०६ शिवाजी नगर, पुणें ४

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, ' नवभारत ' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# 'नवभारत' मासिक, जानेवारी १९५५

## —लेखक-परिचय—

[ खालीं दिलेल्या लेखकांशिवाय या अंकांतील इतर लेखकांचा परिचय या वर्षी यापूर्वी त्यांचे लेख आले त्या त्या वेळीं दिला आहे– का. सं. ]

**आचार्य शं. द. जावडेकर** ( इस्लामपूर ) – सुप्रसिद्ध राज्यनीतिशास्त्रज्ञ आणि ग्रंथकार. महाराष्ट्र-साहित्यसंमेलनाचे माजी अध्यक्ष. ' नवभारत ' मासिकाचे एक संपादक.

**म. म. प्रा. वा. वि. मिराशी** ( नागपूर ) – सुप्रसिद्ध प्राच्यविद्यापंडित व पुराणेतिहाससंशोधक. ' कालिदास ', ' संशोधनमुक्तावली ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. प्र. शं. धोंगडे** साहित्यप्राज्ञ – वाई येथील नगरपालिकेंत नौकरी. हे वाई येथें ' शिलेदार ' हें साप्ताहिक कांहीं काळ चालवीत होते.

**श्री. ना. ल. वैद्य** एम्. ए. बी. टी. – हल्लीं लंडन येथें शिक्षणशास्त्राचा अभ्यास करीत आहेत. पूर्वी ते ॲडिस अबाबाला होते. त्यांचे लेख व लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**श्री. वि. ज. बोरकर** – मुंबई येथील विल्सन कॉलेजमध्यें विद्यार्थी. यांच्या कविता मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**प्रा. दे. द. वाडेकर** – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें व पुणें विद्यापीठांत तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक. ' आधुनिक मानसशास्त्र : इतिहास व संप्रदाय ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**प्रा. य. का. सोहनी** – पुणें येथील फर्ग्युसन कॉलेजमध्यें व पुणें विद्यापीठांत फ्रेंचचे प्राध्यापक. ' सुरस फ्रेंचकथा ' या पुस्तकाचे लेखक. मुंबई राज्यांतील फ्रेंच-शिक्षक-संघाचे चिटणीस.

**श्री. चिं. त्र्यं. केंघे** बी. ए. ( ऑ. ) ( नाशिक ) – संत वाङ्मय व शांकर वेदान्त यांचे व्यासंगी.

**श्री. सरोजिनी शारंगपाणि** बी. ए. ( रत्नागिरि ) – यांचे लेख व लघुकथा मराठी नियतकालिकांतून प्रसिद्ध होत असतात.

**श्री. राजा मंगळवेढेकर** – दौंड येथील ' मजदूर-पंचायत'मध्यें काम करतात.

**प्रा. शि. श्री. काळे** – पुणें येथील ' बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स ' मध्यें प्राध्यापक.

**श्री. माधवराव बागल** – कोल्हापूर येथील सुप्रसिद्ध कार्यकर्ते व लेखक. चित्रकला व साहित्य यांचे व्यासंगी. ' जीवनप्रवाह ' या आत्मचरित्राचे लेखक.

**प्रा. य. र. आगाशे** ( पुणें ) – मराठीचे प्राध्यापक. हल्लीं सेवानिवृत्त. ' सारस्वत-समीक्षा ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. कृ. ना. फडके** बी. ए. एलूएल्. बी. ( पुणें ) – महाराष्ट्रांतील एक मार्क्सवादी कार्यकर्ते.

**श्री. दि. के. बेडेकर** एम्. ए. ( पुणें ) – सुप्रसिद्ध मार्क्सवादी विचारवंत व साहित्यसमीक्षणकार. ' संयुक्त महाराष्ट्र ', 'साहित्यः निर्मिति व समीक्षा' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

**श्री. श्री. रा. टिकेकर** ( मुंबई ) – ' मुसलमानी मुलुखांतील मुशाफरी ', ' सिंहाला शह ' इत्यादि पुस्तकांचे लेखक.



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आचार्य शं. द. जावडेकर

# आत्मवाद आणि आत्मराज्य

भूदान-आंदोलनाच्या रूपानें भारतांत जें सामाजिक व आर्थिक क्रांतीच कार्य सुरूं झालें आहे त्याचा आवाज भारतांतील खेडयांपाडयांत पसरलेल्या कोटय-वधी जनतेंत घुमूं लागला असून तो ध्वनि अमेरिका व रशियापर्यंत जाऊन पोहोंचला आहे. भारतांत एक अभूतपूर्व असें आंदोलन सुरूं झालें असून जी सामाजिक व आर्थिक क्रांति युरोपखंडांत व रशिया-चीन सारख्या खंडतुल्य राष्ट्रांत रक्तपाताच्या व वर्गयुद्धाच्या रूपानें घडवून आणण्याचे प्रयत्न चालू आहेत ती सामाजिक व आर्थिक क्रांति अहिंसेच्या मार्गानें भारतांत घडून येत आहे अशी भाषा जगांतील सर्व विचारवतांच्या तोंडून बाहर पडूं लागली आहे. आचार्य विनोबा यांनीं मामुली स्वरूपाचा विधायक कार्यक्रम बाजूस ठेवून भू-दान-आंदोलनाच्या रूपानें जमिनीवरील व संपत्तीवरील खाजगी व्यक्तींचें स्वामित्व नष्ट करून समाजाचें स्वामित्व संस्थापित करण्याच्या क्रांतीची घोषणा केल्यावरोबर या क्रांतीची चाहूल जयप्रकाश नारायण यांच्यासारख्या क्रांतिकारक प्रकृतीच्या नेत्यांना प्रथम लागली. ज्या वेळीं सर्वसामान्य सुशिक्षित वर्गाचें चित्त अधिकारारूढ कॉंग्रेस पक्ष आणि त्याचे नेते यांनीं आपणाकडे वेधून [illegible]लें होतें आणि ज्या वेळीं सर्वसामान्य गांधीवादी त्या विचारप्रवाहाबरोबर चालूं लागले होते, त्याचवेळीं आचार्य विनोबांनीं तेलंगणांत असतांना भू-दान-यज्ञाचा आदेश ऐकिला आणि त्याची प्रकट घोषणा आपल्या मुखानें केली. केवळ तेलंगणांतीलच नव्हें तर सर्व आशिया-खंडांतील सामान्य जनतेला जमिनीची भूक लागलेली आहे आणि ही भूक शमन झाल्यावांचून जगांतील कोणतेंहि राज्य व कोणताहि समाज सुस्थिर बनूं शकत नाहीं याचा त्यांना तेलंगणातील परिस्थिति पाहून साक्षात्कार झाला. खेडयांतील शेतकऱ्याला लागलेली शेत-जमिनीची भूक, कारखान्यांतील कामगारांना लागलेली भाकरीची भूक आणि सर्वसामान्य नागरिकांना लागलेली शांततेची व युद्धबंदीची भूक या तीन भुकांतूनच रशियांतील साम्यवादी क्रांतीचा स्फोट झाला. कसणाऱ्याला जमीन, खपणाऱ्याला भाकरी आणि लढून थकलेल्यांना व युद्धास विटलेल्या सैनिकांना युद्धबंदी व शांतता अशी त्रिविध घोषणा करून लेनिननें, झारशाहीचा गड कोसळून पडल्यानंतर रशियांत जें अराजक माजलें होतें, तें अराजक शांत करण्याच्या उद्देशानें आपल्या पक्षाची हुकूमशाही राजदण्ड हातीं घेऊन स्थापन केली. राजदण्डाचा आधार घेऊन हुकूमशाही मार्गानें जगांत जमिनीचें व संपत्तीचें समान वांटप करून सर्व जगांतील वर्गसंस्थेचा व राज्यसंस्थेचा लोप करण्याचा व शांततेची संस्थापना करण्याचा हा एक प्रयोग होता.

ज्या सालीं लेनिननें रशियांत या प्रयोगाचा प्रारंभ केला त्याच सालीं म्हणजे १९१७ सालीं भारतांत म० गांधींनीं बिहार-प्रांतांतील चंपारण्यांत सत्याग्रही क्रांतीचा यज्ञ सुरूं केला. बिहार-प्रांत हा क्रांतिकारक अहिंसावादाचा आद्य प्रणेता जो गौतम बुद्ध त्याचा देश म्हणून भारतीय इतिहासांत प्राचीन कालीं प्रसिद्ध झाला. आज तो राजेंद्रबाबू आणि जयप्रकाशजी यांचा प्रांत म्हणून प्रसिद्ध आहे. आचार्य विनोबा यांनीं, याच बिहार-प्रांतांतील बोधिगया येथें भरलेल्या सर्वोदय-संमेलनाच्या वेळीं, भू-दान-आंदोलनाचें अंतिम ध्येय शासनयुक्त समाज आणि संपत्तीचें सामाजिकीकरण हें आहे व त्याचा आधार ग्रामोद्योग आणि स्वावलंबी स्वयंपूर्ण ग्रामसंस्था असा असावा ही तत्त्वें विशद रूपानें संमेलनापुढें मांडली. या सर्वांगीण सामाजिक

प्रस्तुत लेखाचा हिन्दी अनुवाद ‘ सर्वोदय ’ ( वर्धा ) मासिकाच्या ऑगस्ट १९५४ च्या अंकांत प्रसिद्ध झाला आहे.





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

क्रांतीच्या यज्ञांत आपलें समग्र जीवन समर्पण करणाऱ्या अहिंसक क्रांतिकारकांची एक संघटनाहि श्री. जयप्रकाश यांच्या नेतृत्वाखालीं त्याचवेळीं जन्मास आली.

## बुद्धिवादी प्रागतिक आणि आत्मवादी सत्याग्रही

१९१७ सालीं युरोपखंडांत रशियन क्रान्तीनंतर प्रागतिकांचें बुद्धिवादी तत्त्वज्ञान मागें पडून कम्युनिझमचें क्रांतिकारक तत्त्वज्ञान पुढें येऊं लागलें. बुद्धिवादानें समाजाच्या सर्व समस्या सोडवून दाखवितां येतील आणि सशस्त्र क्रांतीचा मार्ग न अवलंबितां समाजांत क्रमाक्रमानें स्वातंत्र्याची, समतेची, व बंधुभावनेची संस्थापना होऊन सर्वत्र लोकशाहीचें, राष्ट्रीय स्वयंनिर्णयाचें आणि शांततेचें साम्राज्य फैलावेल अशी प्रागतिकांची निष्ठा होती. जॉन मोर्ले-सारखे जे खरे निष्ठावंत प्रागतिक होते त्यांनीं, पहिलें महायुद्ध सुरूं होतांच जगांतील प्रागतिक तत्त्वज्ञानाचा अंत जवळ आला हें ओळखून, राजकारणाचा संन्यास घेतला. महायुद्ध चालवितांना व तें संपल्यानंतर ज्या समस्या मानव-संस्कृतीपुढें येऊन उभ्या राहतील त्या सोडवून दाखविण्याचें सामर्थ्य प्रागतिकांच्या केवळ बुद्धिनिष्ठ सुधारणावादांत किंवा प्रागतिक तत्त्वज्ञानांत उरलेलें नाहीं आणि म्हणून आपल्या काळांत भरभराटीस आलेल्या प्रागतिक तत्त्वज्ञानाचें युग आतां संपलें याची जाणीव मोर्ले यांना सर्वांत प्रथम झाली. पहिल्या महायुद्धांत रशियांत क्रांति होऊन भांडवलशाही संस्कृतीचा अंत करणारा साम्यवाद अथवा क्रांतिकारक समाजवाद जगांत मूर्त स्वरूपांत अवतरला. जें क्रांतिकारक समाजवादी तत्त्वज्ञान सुमारें पाउणशें वर्षें भांडवलदार लोकशाहीनें दडपून ठेविलें होतें तें सशस्त्र क्रांतीच्या रूपानें व शास्त्रीय समाजवादाच्या नांवानें सर्व जगांत उत्पात निर्माण करूं लागलें. असें असलें तरी पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस प्रेसिडेंट विल्सन, लॉइड जॉर्ज आणि क्लेमेंको या तिघांनीं, भांडवलशाहीस समाजवादानें दिलेल्या ह्या आव्हानाकडे पूर्ण दुर्लक्ष करून, भांडवलदार लोकशाहीला चिरंतन करण्यासाठीं राष्ट्रसंघ आणि त्याच्या संरक्षणाखालीं युरोप-खंडांत नव्यानें निर्माण केलेलीं छोटीं छोटीं लोकशाही राष्ट्रीय राज्यें यांची एक अद्‌भुत मायासृष्टि कांहीं काळ निर्माण केली. पण थोड्याच वर्षांत ही मायासृष्टि नष्ट होऊन सर्व युरोपखंडांत प्रागतिक तत्त्वज्ञानाला कायमची मूठमाती देणारे हिट्लर व मुसोलिनी यांचा उदय झाला आणि जागतिक राजकारण दुसऱ्या महायुद्धाच्या दिशेनें जोरानें वाहूं लागलें. सर्वत्र लोकशाही धोक्यांत आली आणि तिच्या संरक्षणाच्या मिषानें सर्व जगाला उध्वस्त करणारें दुसरें महायुद्ध जगभर पेटलें. पहिल्या महायुद्धानंतर प्रागतिक लोकशाहीला व प्रागतिक तत्त्वज्ञानाला चिरंतन करून केवळ बुद्धिवादाच्या बळावर आणि तें बळ जेथें कमी पडेल तेथें शस्त्रबळाचा उपयोग करून मानवसंस्कृतीपुढील सर्व समस्या सोडवून दाखविण्याचा प्रयत्न अशा रीतीनें पूर्णपणें अपेशी ठरला.

याच काळांत म्हणजे १९१७ सालीं रशियन राज्यक्रान्ति झाली. तेव्हांपासून १९३७ सालीं दुसरें महायुद्ध सुरूं झालें तोंपर्यंतच्या वीस वर्षांपर्यंतच्या काळांत भारतांत आत्मवादी सत्याग्रही तत्त्वज्ञानाचा उदय झाला व त्याचा प्रभाव भारतीय राजकारणावर पूर्णपणें पडला. आधुनिक युरोपनें, बुद्धिवादी प्रागतिक राजकारण अपुरें पडल्याचें पाहून, कम्युनिझमचें व नाझीझमचें शस्त्रग्राही राजकारण स्वीकारिलें आणि प्रागतिक लोकशाहीचा अंत झाला. त्याच वेळीं भारतानें सत्याग्रहाचा आश्रय करून गांधी-नेहरूंच्या नेतृत्वाखालीं लोकशाहीचीं व समाजवादाचीं ध्येयें आत्मसात् करून आत्मबलाचा प्रभाव प्रकट करणारें सत्याग्रही क्रान्तिशास्त्र निर्माण केलें आणि मानवसंस्कृतीपुढील समस्या क्रान्तिकारक अहिंसावादानें सोडवून दाखविण्याचा निर्धार केला. बुद्धिवादी प्रागतिक हिंदी राजकारणांत मागें पडले आणि आत्मवादी सत्याग्रही भारतीय राजकारणावर व भारतीय संस्कृतीवर आपला प्रभाव गाजवूं लागले. दुसऱ्या महायुद्धानंतर राष्ट्रीय स्वातंत्र्य व स्वयंनिर्णय या हक्कांची प्राप्ति होऊन भारतांत लोकशाही राज्यघटना संस्थापित झाली हें खरें असलें, तरी भारतीय घटनापरिषदेनें या राष्ट्रांत जी राज्यघटना बनविली आहे ती सत्याग्रही आत्मवादी तत्त्वावर उभारलेली नसून तिची उभारणी व्यक्तिवादी प्रागतिक तत्त्वज्ञानावरच झालेली आहे. यामुळें येथील आजच्या राज्यघटनेला समाजवादी लोक "भांडवलदार



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लोकशाही " असें यथार्थ नांव देतात आणि सत्याग्रही गांधीवादी सुद्धां त्या राज्यघटनेंत आपलीं तत्त्वें अंतर्भूत झालीं आहेत अथवा त्या राज्यघटनेखालील कारभार सत्याग्रही तत्त्वांनुसार चालत आहे किंवा चालूं शकेल असें मानीत नाहींत. याचमुळें भारतीय समाजवादी आणि सत्याग्रही गांधीवादी हे दोघेहि अहिंसेच्या अधिष्ठानावर एक होऊन भारतांत एक सर्वांगीण सामाजिक व आर्थिक क्रान्ति करूं लागले आहेत. भू-दान, संपत्तिदान, श्रमदान, बुद्धिदान आणि जीवनदान — या रूपांनीं या भारतीय सर्वांगीण क्रान्तीला आवाहन करण्याचें कार्य आचार्य विनोबा व जयप्रकाश नारायण हे करीत आहेत. या क्रान्तीच्या बुडाशीं असणारें आत्मवादी सत्याग्रही तत्त्वज्ञान शस्त्रग्राही साम्यवादाच्या तत्त्वज्ञानाहून भिन्न आहे तसेंच तें बुद्धिवादी व व्यक्तिवादी प्रागतिक तत्त्वज्ञानाहूनहि भिन्न व या दोहोंहूनहि श्रेष्ठ असें तत्त्वज्ञान आहे. आधुनिक भारतांत व्यक्तिवाद, राष्ट्रवाद व समाजवाद हीं तीन सामाजिक तत्त्वज्ञानें आधुनिक युरोपांतून आलीं. या तीनहि तत्त्वज्ञानांतील सद्-अंश आत्मसात् करून त्यांचा अध्यात्माशीं समन्वय करणारें असें हें चौथें तत्त्वज्ञान असून त्यांतून अथवा त्याच्या प्रेरणेनें निर्माण होणारी भारतीय लोकशाही व भारतीय समाजवाद हे भिन्न आहेत व तसेच ते श्रेष्ठहि आहेत याची जाणीव भारताला व जगालाहि आतां झाली आहे व ती अधिकाधिक होणार आहे.

### प्रागतिक लोकशाही व सत्याग्रही लोकशाही

प्रागतिक लोकशाही (Liberal Democracy) आणि सत्याग्रही लोकशाही ( Democracy based on Non-violence ) या दोहोंमधील तात्त्विक भेद लक्षांत घेतल्यावांचून व तो अधिकाधिक विशद केल्यावांचून भारताला आपल्या देशांत स्थापन झालेल्या भांडवलदार लोकशाहीचें रूपांतर करून सत्याग्रही लोकशाहीच्या दिशेनें आपली प्रगति घडवून आणतां येणार नाहीं. म्हणून प्रागतिक लोकशाही व सत्याग्रही लोकशाही यांतील भेद मला कसा वाटतो, त्याचा थोडा विचार येथें करीत आहे.

प्रागतिकांनीं पुरस्कारिलेल्या बुद्धिस्वातंत्र्याच्या व व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वांचा समाजवाद्यांच्या सामाजिक स्वामित्वाच्या व आर्थिक समतेच्या तत्त्वांशीं समन्वय केला पाहिजे आणि त्याचबरोबर व्यक्तींच्या बुद्धीचें व व्यक्तिमत्त्वाचें शुद्धीकरण केलें पाहिजे अशी सत्याग्रही दृष्टि आहे. व्यक्तीनें आपली बुद्धि शुद्ध व पवित्र बनविण्यासाठीं विकार व वासना यांतून तिची मुक्तता करून निरहंकार व निर्मम बुद्धीनें सत्याचें संशोधन व संस्थापन करीत राहण्यांत आपल्या जीविताचें साफल्य मानिलें पाहिजे. अर्थात् सत्यसंशोधन करण्यासाठीं प्रत्येक व्यक्तीला आचारविचारांचें स्वातंत्र्य उपभोगतां आलेंच पाहिजे. अव्यभिचारी सत्यनिष्ठा ही वृत्ति बुद्धींत बाणविणें हाच स्थितप्रज्ञावस्थेचा व्यावहारिक अर्थ आहे. पण ही अव्यभिचारी सत्यनिष्ठा बुद्धींत यावयाची तर बुद्धि स्वहितपर न उरतां ती सर्वहितनिष्ठ बनली पाहिजे. स्वार्थ आणि अहंकार, वैर आणि द्वेष, पक्षपात आणि ममत्व यांतून मुक्त झालेली बुद्धीच अव्यभिचारी सत्यनिष्ठ राहूं शकते. अशा निःस्वार्थी, निरहंकार, निर्वैर व निर्मम अद्वेषभावनेनें आपलें कर्तव्य करण्यासाठीं बुद्धीचें स्वातंत्र्य प्रत्येकानें मिळविलें पाहिजे व तें प्रत्येकास मिळेल अशी समाजघटना व राज्यघटना अस्तित्वांत आली पाहिजे. अशी समाजघटना व राज्यघटना अस्तित्वांत आणण्यासाठीं अन्यायी धर्माचार, सामाजिक रूढि आणि राजकीय बंधनें यांचें शांततेनें उल्लंघन करून आपली स्वतःची व समाजाची उन्नति करून घेण्याचा नैतिक हक्क प्रत्येकास असला पाहिजे; किंबहुना, या हक्काची अनत्याचारी व अद्वेषभावनेनें बजावणी करणें हें प्रत्येक सत्याग्रही व्यक्तीचें कर्तव्य आहे असेंच मानण्यांत आलें पाहिजे. परंपरागत धर्माचार, सामाजिक रूढि व राजकीय कायदे यांचें अंधत्वानें पालन करणें आणि धार्मिक, सामाजिक व राजकीय जुलुमांशीं सहकार्य करणें ही गुलामी वृत्ति आहे. म्हणून समाजांत विषमता व द्वेष फैलावणाऱ्या धर्माचारांविरुद्ध आत्मोन्नति व समाजोन्नति साधूं पाहणाऱ्या सत्याग्रहींनीं निर्वैर व अद्वेष वृत्तीनें झगडत राहिलें पाहिजे, समत्व आणि बंधुत्व यांच्याशीं विरोधी ज्या सामाजिक रूढी असतील त्यांचें उल्लंघन करून समाजांत समता व बंधुभावना यांची संस्थापना केली पाहिजे आणि अन्यायी कायद्यांचें उल्लंघन करून न्यायी कायदे प्रस्थापित करण्यासाठीं भोगावे लागणारे क्लेश निर्वैर व अद्वेष वृत्तीनें सहन केले पाहिजेत.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील सत्याग्रही वृत्तीनें वागणाऱ्या नागरिकांना लोकशाही राज्यांतसुद्धां सविनय कायदेभंगाचा हक्क असला पाहिजे हें तत्त्व केवळ प्रागतिक दृष्टीनें विचार करणाऱ्या राजकीय तत्त्वज्ञांना पटत नाहीं. एकदा प्रातिनिधिक लोकशाही प्रस्थापित झाली आणि कायदे करण्याचा हक्क लोकनियुक्त प्रतिनिधींना प्राप्त झाला म्हणजे प्रजेला सविनय कायदेभंगाचा हक्क उरत नाहीं असें प्रागतिकांच राजकीय तत्त्वज्ञान आहे.

सत्याग्रही तत्त्वज्ञानानें प्रातिनिधिक लोकशाही ही आजच्या परिस्थितींत व मानवसंस्कृतीच्या आजच्या अवस्थेंत मान्य केली असली तरी तिच्याखालींहि सत्याग्रहाचा व सविनय कायदेभंगाचा हक्क प्रजेला असला पाहिजे असें सत्याग्रही तत्त्वज्ञान आहे. कायद्याचें राज्य ( Rule of Law ) आणि प्रतिनिधि-सभेचें प्रभुत्व ( Sovereignty of Parliament ) अशीं ब्रिटिश लोकशाहीचीं दोन आधारभूत तत्त्वें म्हणून सांगण्यांत येतात. या तत्त्वांना सत्याग्रही तत्त्वज्ञानांत प्रजेची अंतिमनिष्ठा म्हणून मान्यता देतां येणार नाहीं. याच्यापुढें जाऊन "प्रजेच्या अंतरात्म्याचें प्रभुत्व" आणि "न्यायाचें राज्य" अशा शब्दांनीं सत्याग्रही लोकशाहींतील अंतिम निष्ठा व्यक्त करावी लागेल.

प्रागतिक लोकशाही आणि सत्याग्रही लोकशाही यांतील दुसरा भेद असा सांगतां येईल कीं प्रत्येक व्यक्तीनें आपापला स्वार्थ साधण्याचा प्रयत्न केला असतां व तसें स्वातंत्र्य सर्व व्यक्तींना दिलें असतां समाजाचें हित आपोआपच साधिलें जातें हा भ्रामक युक्तिवाद सत्याग्रही तत्त्वज्ञानाला मुळींच मान्य नाहीं. याच्या उलट, अशा प्रकारच्या भ्रामक युक्तिवादावर भांडवलशाही संस्कृतीची उभारणी झालेली असून बेंथॅम, ॲडम स्मिथप्रभृति प्रागतिक तत्त्वज्ञानाच्या आद्य प्रणेत्यांनीं वरील भ्रामक युक्तिवादाचा पुरस्कार करून तें तत्त्व अथशास्त्रांतील एक आधारभूत गृहीतकृत्य म्हणून मान्य केल होतें. आतां या तत्त्वांतील भ्रामकपणा बराच उघडकीस आला असून आर्थिक व्यवहारांत नियंत्रण व नियोजन यांची आवश्यकता सर्वच अर्थशास्त्रज्ञांनीं मान्य केलेली आहे. अस असलें तरी स्वार्थ आणि स्पर्धा या तत्त्वांवर उभारलेल्या भांडवलशाही समाजरचनेचा मूळ आधारच बदलून घेतला पाहिजे आणि स्वार्थाएवजीं सेवा व स्पर्धेऐवजीं सहकार्य या तत्त्वांवर नव्या आर्थिक व सामाजिक घटनेचा पाया घातला पाहिजे याची जाणीव प्रागतिक अर्थशास्त्रज्ञांना व समाजशास्त्रज्ञांना अद्यापि झालेली नाहीं. या बाबतींत सत्याग्रही तत्त्वज्ञान हें समाजवादी मताचें असून संपत्तीचें सामाजिक स्वामित्व, वर्गहीन समाज, आर्थिक समता सहकार्य आणि सेवा या तत्त्वांवर नवसमाजाची निर्मिति केली पाहिजे, असें त्याचें मत आहे. ही एक आजच्या मानव-संस्कृतींत मूलभूत क्रांति आहे व ती क्रांति अहिंसक पद्धतीनें व लोकशाही मार्गानें घडवून आणिली तरच ती यशस्वी होईल आणि लोकशाही व समाजवाद यांना आधारभूत अशीं स्वातंत्र्य, समत्व व बंधुत्व हीं जीं ध्येयें तीं मूर्त स्वरूपास येऊन मानवसंस्कृति सुखानें व शांततेनें नांदूं लागेल अशी सत्याग्रही निष्ठा आहे. याच्या उलट, व्यक्तीला धनसंग्रहाचा व धनसंवर्धनाचा हक्क असला पाहिजे आणि आर्थिक वर्गभेद हा भांडवलशाही संस्कृतीचा आधार कायम टिकला पाहिजे अशी प्रागतिक तत्त्वज्ञानाची मूळ धारणा असून आज अमेरिकेंत ही निष्ठा हीच आपली संस्कृति व तिच्यावांचून लोकशाही टिकूं शकणार नाहीं अशी श्रद्धा फैलावली आहे. ख्रिस्तानें उपदेशिलेल्या जीवनमूल्याचा आधार या निष्ठेंतच त्यांना दिसतो आणि म्हणून संपत्तीचें सामाजिक स्वामित्व व वर्गहीन समाज या ध्येयांचा पुरस्कार करणारा समाजवाद हा कोणत्याहि साधनानें उखडून काढणें हेंच आपलें संस्कृतीचें संरक्षक या नात्यानें कर्तव्य आहे ही वृत्ति त्या राष्ट्रांत बळावत आहे. याच्या उलट, समाजवादी आर्थिक घटनेचीं तत्त्वें मान्य केल्यावांचून व त्या तत्त्वांवर नवसमाजनिर्मिति केल्यावांचून लोकशाही सार्थ ठरूं शकत नाहीं अशी सत्याग्रही दृष्टि आहे. यामुळें सत्याग्रह हा प्रागतिकांच्या सुधारणावादाहून भिन्न बनला असून तो अहिंसक असला तरी क्रांतिवाद आहे. किंबहुना, अहिंसक क्रांतिवाद हाच खरा शास्त्रीय क्रांतिवाद असून साम्यवाद्यांचा शस्त्रग्राही क्रांतिवाद हा अशास्त्रीय क्रांतिवाद आहे व त्याचा आश्रय करून लोकशाही व समाजवाद यांना अभिप्रेत असणारीं ध्येयें कधींच प्राप्त होणार नाहींत अशी त्याची निष्ठा आहे.

ही सामाजिक क्रांति केवळ बुद्धिबलानें अथवा



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मतपरिवर्तनाच्या युक्तिवादी पद्धतीनें घडवून आणतां येणार नाहीं. समाजाचा मूलभूत विश्वास अथवा निष्ठा यांत मतपरिवर्तन घडवून आणण्यास प्रागतिकांचें बुद्धिबल अथवा युक्तिवाद हें साधन अपुरें पडतें असा अनुभव आल्यानंतर आत्मबलाचा मार्ग गांधीजींनीं शोधून काढिला. या आत्मबलाच्या मार्गांत तीन प्रकारचें परिवर्तन अभिप्रेत असतें. या त्रिविध परिवर्तनासच आचार्य विनोबा यांनीं "क्रांतीचा त्रिकोण" असा यथार्थ शब्द वापरला आहे. (१) मतपरिवर्तन (२) हृदयपरिवर्तन आणि (३) परिस्थितिपरिवर्तन असें हें त्रिविध परिवर्तन समाजांत घडवून आणून कोणतीहि समाजहितास आवश्यक क्रांति अहिंसेनें घडवून आणितां येईल अशी सत्याग्रही निष्ठा आहे. जे स्वभावतः सज्जन आहेत आणि समाजांत न्यायसंस्थापना व्हावी अशी ज्यांची सहजवृत्ति आहे त्यांचें मतपरिवर्तन सत्याग्रही लोकसेवकांच्या सतत उपदेशानें आणि सक्रिय नैतिक पाठिंब्यानें त्वरित होऊं शकतें. पण ज्यांची न्यायबुद्धि रूढ व्यवहारपद्धतीनें मंद व मलिन झाली असेल त्यांचें मतपरिवर्तन घडून येण्यापूर्वीं हृदयपरिवर्तन घडून यावें लागतें. त्यासाठीं सत्याग्रहाचा, असत्याचारी असहकाराचा आणि आत्मक्लेशाचा मार्ग स्वीकारून समाजाचें हृदयपरिवर्तन आणि सामाजिक मूल्यांचें नवदर्शन घडवावें लागतें. सभोवारच्या समाजांत असें हृदयपरिवर्तन घडून आलें आणि रूढ अन्यायांविरुद्ध असहकार व सत्याग्रह करण्याचा मार्ग अन्यायानें पीडिलेली जनता अवलंबूं लागली म्हणजे परिस्थिति-परिवर्तन झालेंच. परिस्थिति-परिवर्तन होईपर्यंत, ज्यांचें मतपरिवर्तन झालें नसेल त्यांचेंहि मतपरिवर्तन या नव्या परिस्थितीचें दर्शन झाल्यानंतर होऊं शकतें आणि तेहि क्रांतीला विरोध सोडून देतात आणि त्यांच्यापैकीं कांहीं क्रांतीला पाठिंबा देण्यासहि पुढें सरसावतात. अशी परिस्थिति निर्माण झाल्यानंतर क्रांतीला कायदा किंवा राजदंड रोखूं शकत नाहीं; उलट कायदा व राजदंड त्या क्रांतीच्या मागोमाग जाऊन तिची साथ करूं लागतात. अशा रीतीनें मतपरिवर्तन, हृदयपरिवर्तन आणि परिस्थितिपरिवर्तन असा "क्रांतीचा त्रिकोण" पूर्ण करून सत्याग्रही साधनानें जी क्रान्ति घडून येईल तीच खरी क्रांति होय. या क्रांतिशास्त्रालाच शास्त्रीय क्रान्तिशास्त्र असें नांव देता येईल. या सत्याग्रही दृष्टीनें विचार करणाऱ्यांस मार्क्सवादांतून निर्माण होणारें हुकूमशाही क्रान्तिशास्त्र अशास्त्रीय वाटतें.

## भांडवलदारांचें परिवर्तन

मतपरिवर्तन, हृदयपरिवर्तन आणि परिस्थितिपरिवर्तन या त्रिविध परिवतनाच्या आधारें सत्याग्रहानें सामाजिक क्रान्ति घडवून आणितां येईल या निष्ठेवर मार्क्सवादाच्या आधारें असा आक्षेप घेण्यांत येतो कीं भांडवलदारांचें मतपरिवर्तन केव्हांच घडून येणार नाहीं. मार्क्स हा वर्गयुद्धाचें तत्त्व शोधून काढणारा व त्या तत्त्वाचा पुरस्कार करणारा असल्यामुळें वरील आक्षेप समाजवादी, निदान मार्क्सवादी दृष्टीनें तरी पूर्णपणें निरुत्तर करणारा आहे असें समजलें जातें. मार्क्सला झालेलें मनुष्यस्वभावाचें दर्शन व मानवी मनाचें दशन हेंच अंतिम सत्य होय व त्यांत अधिक संशोधन करण्याची मुळींच आवश्यकता नाहीं हें मतच अशास्त्रीय आहे असें उत्तर देऊन हा आक्षेप खोडून काढितां येईल. गांधीजींनीं सत्याग्रही क्रांतिशास्त्र शोधून काढून त्याचा प्रभाव दाखविला तो प्रभाव काल्पनिक नसून वास्तविक आहे आणि वस्तुनिष्ठ क्रान्तिशास्त्राचा जनक म्हणून प्रसिद्ध असलेल्या मार्क्सनें जर हा प्रभाव पाहिला असता तर त्यानेंहि आपल्या सिद्धान्तांचें अधिक संशोधन केलें असतें अस श्री. जयप्रकाश समाजवाद्यांना सांगत असतात. पण याच्याहि पुढें जाऊन मला असें म्हणावयाचें आह कीं भांडवलशाही आर्थिक घटनेमुळें जो वर्गकलह समाजांत एकसारखा वाढत जातो त्या वर्गकलहाची परिस्थिति अधिकाधिक तीव्र बनूं लागली म्हणजे भांडवलदारवर्गांतील लोकांचेंहि मतपरिवर्तन होऊं लागतें आणि त्यांच्यापैकीं अनेक लोक क्रांतीला विरोध करण्याचें सोडून देऊन तिच्यांत सामील होतात व कांहीं तिचें नेतृत्वहि करूं लागतात हें मार्क्सलाहि दिसत होतें. यासंबंधीं मार्क्सच्या कम्युनिस्ट जाहीरनाम्यांतील पुढील उतारा मननीय व बोधप्रद आहे:

" Finally, in times when the class-struggle nears the decisive hour, the process of dissolution going on within the ruling class – in fact, within the whole range of



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

an old society - assumes such a violent, glaring character that a small section of the ruling class cuts itself adrift and joins the revolutionary class, the class that holds the future in its hands.

" Just as, therefore, at an earlier period a section of the nobility went over to the bourgeoisie, so now a portion of the bourgeoisie goes over to the proletariat, and in particular, a portion of the bourgeois ideologists who have raised themselves to the level of comprehending theoretically the historical movements as a whole. "

कम्युनिस्ट जाहीरनाम्यांतील वरील उतारा लक्षपूर्वक वाचिल्यास भांडवलशाही समाजांतील वर्गकलह वाढत जाऊन ती समाजघटना डळमळून कोसळूं लागली म्हणजे भांडवलदार-वर्गांतील अनेक गट आणि विशेषतः त्यांच्यातील दूरदृष्टीचे विचारक, ज्यांना एकंदर समाजाच्या परिवर्तनाची दिशा आकलन करतां येते ते लोक, क्रांतीला विरोध करायचें सोडून क्रांतिकारक पक्षांत सामील होऊं लागतात असेंच मार्क्सला वाटत होतें हें लक्षांत येईल. या आपल्या मतास आधार देण्यासाठीं म्हणून मार्क्सनें सरंजामशाहीविरुद्ध क्रांति झाली त्यावेळीं त्या वर्गांतील लोकहि अखेरीस क्रांतींत सामील झाले ही ऐतिहासिक घटना नमूद केली आहे. सत्याग्रही तत्त्वज्ञानांतील मतपरिवर्तनाचा व हृदयपरिवर्तनाचा सिद्धान्त आणि मार्क्सवादी दृष्टिकोन यांचा अभेद सिद्ध करावा असा माझा हेतु नाहीं. वरील उतारा देण्यांत एवढाच हेतु आहे कीं समाजाचें हृदयपरिवर्तन आणि सामाजिक परिस्थितीचें परिवर्तन झालें असतां भांडवलदार लोकांचेंहि मतपरिवर्तन होणारच नाहीं असा दुराग्रह धरणें हें मार्क्सवादांतहि बसूं शकत नाहीं. तें कांहीं असलें तरी ज्यांनीं सत्याग्रहाचा प्रभाव पाहिला आहे त्यांनीं आचार्य विनोबा यांचा क्रांतीच्या त्रिकोणाचा सिद्धान्त लक्षांत घेतल्यास ते अशा प्रकारच्या दुराग्रहाला बळी न पडतां क्रांतीला आवश्यक असणारें त्रिविध परिवर्तन घडवून आणण्यासाठीं आपलें जीवनदान करण्याचा संकल्प करतील.

मार्क्सवादी म्हणविणाऱ्यांच्या विचारांत वास्तविक इतिहासाचा आणखी एक विपर्यास आढळून येतो. तो म्हणजे त्यांच्या बोलण्यावरून लोकांचा असा समज होतो कीं क्रान्ति ही नेहमीं कोणता तरी एकच वर्ग करीत असतो व दुसरे वर्ग संघटितपणें त्याला विरोध करीत असतात. परंतु रशिया किंवा फ्रान्स या राष्ट्रांत ज्या क्रान्त्या घडून आल्या त्यांचा वास्तविक इतिहास तसा नाहीं. क्रान्ति होण्याच्या वेळीं सर्वच वर्ग निरनिराळ्या कारणांनीं प्रस्थापित राजसत्तेविरुद्ध असंतुष्ट होऊन तिला उलथून पाडण्यास उद्युक्त झालेले असतात आणि जुनी राजसत्ता सर्वांच्याच अत्याचारी अथवा अनत्याचारी असहकारानें कोसळून पडून समाजांत अराजक माजतें. अशा अराजकावस्थेंत निरनिराळे पक्ष आपल्या हातीं सत्ता घेऊन स्वतःच्याच पक्षाची हुकूमशाही स्थापन करण्याचा प्रयत्न करतात. अशा प्रयत्नांतूनच लोकशाहीचा लोप होऊन अखेरीस हुकूमशाही स्थापन होते. या इतिहासापासून बोध घेऊन त्याची पुनरावृत्ति होऊं नये म्हणूनच सत्याग्रही क्रान्तिशास्त्र जन्मास आलें आहे. या क्रान्तिशास्त्रांत केवळ युक्तिवादानेंच नव्हे तर आत्मक्लेशानें, असहकारानें आणि सत्याग्रहानें समाजांतील सर्व व्यक्तींचें हृदयपरिवर्तन व मतपरिवर्तन घडवून आणितां येईल असें गृहीत धरलें आहे. हान्त्र आत्मवादी सिद्धान्त असून प्रत्येकाच्या अंतःकरणांत न्यायनिष्ठेचा अंतरात्मा वसत असतो व तो जागृत होत असतो असा त्याचा अर्थ आहे. समाजांतील ही न्यायबुद्धि जागृत होऊन तिनें प्रस्थापित व रूढ न्याय-अन्यायाच्या कल्पनांत क्रान्ति घडवून आणिली असतां एक नवी क्रान्तिकारक परिस्थिति निर्माण होते व या क्रान्तिकारक परिस्थितीपुढें सर्वांनाच नमावें लागतें. नव्या परिस्थितीची जाणीव सत्ताधारी व संपत्तिमान् वर्गांनाहि झाल्यावांचून कशी राहील ? म्हणून क्रान्ति केवळ एकच वर्ग करीत असतो हेंहि ऐतिहासिक सत्य नाहीं आणि क्रान्तिकारक परिस्थिति निर्माण झाली असतां तिची जाणीव सधन व सत्ताधारी वर्गांना होत नाहीं हेंहि खरें नाहीं. या विचारांत



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सत्याचा अंश इतकाच आहे कीं ज्यांना प्रचलित समाजरचनेंत सत्ता व संपत्ति यांचा भरपूर उपभोग घेतां येतो त्यांचें मतपरिवर्तन घडवून आणण्यास केवळ बुद्धिबल पुरें पडत नाहीं. पण त्याचबरोबर हेंहि खरें आहे कीं दलित वर्गाला जरी क्रांतीची आवश्यकता लवकर भासली तरी तिच्या स्वरूपाचें यथार्थ आकलन होऊन त्यासाठीं भोगावे लागणारे क्लेश व करावा लागणारा त्याग हे भोगण्यास व करण्यास तो वर्गहि केवळ युक्तिवादानें प्रवृत्त होऊं शकत नाहीं. त्याचें परिवर्तन करण्यासहि क्रांतीच्या त्रिकोणाचा अवलंब करणें अवश्य असतें. म्हणून भू-दान-आंदोलनांतून जी क्रान्ति घडवून आणावयाची तिच्यांत हा त्रिकोण गृहीत धरलेला आहे हें लक्षांत घेतल्यास या बाबतींत मतभेद होण्याचें कारण दिसत नाहीं.

## लोकराज्यांतून आत्मराज्याकडे

प्रातिनिधिक लोकशाही आणि भांडवलदार आर्थिक घटना यांच्या पलीकडे गेल्यावांचून समाजांत शांतता नांदूं शकत नाहीं आणि सर्वांच्या पोटापाण्याचा प्रश्न सुटून न्यायसंस्थापनाहि होऊं शकत नाहीं याचा अनुभव आतां आपणांस आला आहे. प्रातिनिधिक लोकराज्यांतून आपणांस आत्मराज्याकडे जावयाचें असून, शासनमुक्त समाज किंवा दण्डहीन सामाजिक अवस्था व वर्गहीन समाज हीं आपलीं ध्येयें आहेत हें आतां भू-दान-आंदोलनानें निःसंदिग्ध विशद केलें आहे. आत्मराज्याच्या प्राप्तीचा मार्ग संपत्तीच्या सामाजिकीकरणांतून व वर्गहीन समाजाच्या संस्थापनेंतून गेलेला आहे व म्हणून त्याच दिशेनें भारतीय क्रांतीचें सुकाणूं आपण फिरविलें पाहिजे ही गोष्ट बोधिगयेंत भरलेल्या सर्वोदयसंमेलनांत स्पष्ट झाली. वर्गसंस्था आणि संपत्तीची वैयक्तिक मालकी हेच आत्मराज्याच्या प्राप्तींतील आजचे मोठे अडथळे आहेत म्हणून ज्यांना शासनमुक्त समाज हवा असेल त्यांनीं आर्थिक क्रान्ति हेंच आपलें आद्यकर्तव्य समजलें पाहिजे याबद्दल मतभेद उरला नाहीं. पण या आर्थिक क्रांतीचीं साधनें मार्क्सवादांत व गांधीवादांत अगदीं भिन्न आहेत. मार्क्सवाद एकपक्षीय हुकूमशाही स्थापून आर्थिक क्रान्ति करूं पाहतो, तर गांधीवाद किंवा सत्याग्रही क्रांतिशास्त्र क्रांतीचें कार्य पक्षातीत वृत्तीनें व जनशक्तीनें घडवून आणूं इच्छितो.

प्रातिनिधिक लोकशाहींत उदय पावून वाढीस लागलेली राजकीय पक्षपद्धति सामाजिक क्रांतीस एक तर पुरी पडत नाहीं किंवा तिची एकपक्षीय हुकूमशाहींत विकृति होते आणि लोकशाहीचाच अंत होतो, असा अनुभव आल्यामुळें सामाजिक क्रांतीचें कार्य केवळ एका पक्षाचें कार्य न बनवितां तें पक्षातीत वृत्तीनें चालूं रहावें आणि त्या कार्यामागील शक्ति जनतेच्याच हातीं नित्य रहावी अशी सत्याग्रही दृष्टि आहे. सत्याग्रह हा जनतेच्या प्रत्यक्ष प्रतिकारा-(Direct action)चा एक मार्ग याच रूपानें प्रथमतः तो भारतीय राजकारणांत प्रविष्ट झाला. हा संपूर्णपणें अहिंसेचा मार्ग असल्यामुळें त्याचें अंतिम ध्येय दण्डहीन समाज अथवा शासनमुक्त समाज हेंच आहे व त्याची प्राप्ति होण्यासाठीं संपत्तीचें सामाजिकीकरण व वर्गसंस्थेचा अंत केला पाहिजे या गोष्टी बऱ्याच काळानंतर आतां विशद झाल्या. राज्यसंस्थाच नष्ट करावयाची हें ध्येय स्वीकारल्यानंतर तिचाच अवलंब करून सामाजिक क्रांति घडवावयाची ही मार्क्सवादांतील विसंगति लक्षांत घेतल्यास सामाजिक क्रांतीचें कार्य सत्याग्रहानें करावयाचें तर तें पक्षातीत वृत्तीनेंच केलें पाहिजे आणि प्रातिनिधिक लोकशाहींत प्रबळ बनलेली पक्षसंस्था हळूंहळूं नष्ट केली पाहिजे असा दृष्टिकोन आचार्य विनोबा यांनीं विशेष आग्रहानें आज भारतापुढें मांडला आहे. हा त्यांचा दृष्टिकोन सत्याग्रहाशीं सुसंगत आहे. पक्षपद्धतीचे दोष आतां सर्वच पक्षांचे नेते मान्य करूं लागले आहेत. तथापि पंडित नेहरू व श्री. जयप्रकाश यांच्यासारख्या नेत्यांनाहि अद्यापि पक्षपद्धति नष्ट करून लोकशाही राज्य कसें चालवावें याची वास्तववादी कल्पना येऊं शकत नाहीं. म्हणूनच वास्तववादी राजकीय दृष्टीनें आज जशी प्रातिनिधिक लोकशाही ही सदोष असली तरी अपरिहार्य समजली जाते, तशीच पक्षपद्धति ही सुद्धां सदोष असली तरी ती वास्तववादी दृष्टीनें अपरिहार्य समजली पाहिजे. म्हणून सामाजिक क्रांतीचें कार्य सत्याग्रहानें करावयाचें असें असलें तरी तें कार्य करणाऱ्यांत कोणीहि कोणत्याही पक्षाचा सभासद असूं नये असें न ठरवितां सर्व पक्षांच्या सहकार्यानें तें चालूं रहावें आणि त्या कार्यांत सर्वांनीं पक्षातीत वृत्तीनेंच वागावें असें धोरण ठरलें आहे. राष्ट्रांत राजकीय पक्ष असले तरी सर्व पक्षांना समान











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असे जितके कार्यक्रम निघतील तितके शोधून काढावेत आणि सर्व पक्षांच्या सहकार्याचीं क्षेत्रे वाढवीत जावें हाच पक्षसंस्थेंतील दोष नष्ट करण्याचा व अखेरीस पक्षसंस्था विलीन करण्याचा व्यावहारिक मार्ग आहे. सर्व पक्षांना मान्य अशा कार्यक्रमांत जमिनी व उत्पादनाचीं इतर साधनें यांचें सामाजिकीकरण आणि वर्गहीन समाजाचें संस्थापन या ध्येयांचा प्रचार व त्यासाठीं लागणाऱ्या जनशक्तीचा उठाव हाहि कार्यक्रम समाविष्ट करवून घेण्याचें श्रेय आचार्य विनोबा यांनीं आतां मिळविलें आहे. यामुळें भारतांतील सामाजिक व आर्थिक क्रांतीचें कार्य हा सवपक्षांना समान असा कार्यक्रम बनला आहे. या क्रांतीच्या कार्यक्रमामागें सत्याग्रही जनशक्ति उभी करणें हच कार्य आचार्य विनोबा व जयप्रकाश आज करीत आहेत. सामाजिक व आर्थिक क्रांतीच्या ध्येयांचा प्रचार आणि जनशक्तीच्या अहिंसाबळावर त्यांची अंमलबजावणी हें कार्य सुरूं करून आचार्य विनोबा यांनीं भारतीय इतिहासाला व मानवसंस्कृतीला आत्मराज्याकडे जाण्याचा मार्ग दाखवून दिला आहे.

### आत्मराज्याचें व्यक्त व अव्यक्त स्वरूप

सत्ययुग, परमेश्वरी राज्य, रामराज्य अथवा आत्मराज्य हें ध्येय मानवी अंतःकरणांत निदान रामराज्याच्या काळापासून आजपर्यंत अखंडपणें तेवत आलेलें आहे. राम, कृष्ण, बुद्ध, ख्रिस्त व महंमद या सर्वांचें अंतिम ध्येय हें आत्मराज्यच होतें. या आत्मराज्याचें शुद्ध व पूर्ण स्वरूप अव्यक्त, अनिर्देश्य असेंच आहे. याच सनातन अव्यक्त व अनिर्देश्य ध्येयाचें व्यक्त, निर्देश्य अथवा मूर्त असें एक स्वरूप आपापल्या काळापुरतें बनवून त्याची उपासना करण्याचें साधन मानवाला उपलब्ध करून दिल्यावांचून या आत्मराज्यांत अंतर्भूत होणारीं ध्येयें मानवी व्यवहारांत मूर्त स्वरूपास येऊं शकत नाहींत. भारतीय संस्कृतीनें आपल्या अंतःकरणांतील रामराज्याच्या अमूर्त ध्येयाला मूर्त स्वरूप देण्यासाठींच फार प्राचीन काळीं वर्णाश्रमधर्म अशी सामाजिक संघटना निर्माण केली. या सामाजिक संघटनेच्या मागें आत्मराज्याच्या संस्थापनेची मानवी अंतःकरणांतील सनातन प्रेरणा होती. ही आत्मराज्याची अव्यक्त प्रेरणा सनातन असली तरी तिला वर्णाश्रमधर्माचा जो विशिष्ट आकार दिला व प्राप्त झाला तो आकार सनातन नव्हता व नाहीं. गांधीजींनीं वर्णाश्रमधर्माच्या मागील आत्मराज्याची अव्यक्त प्रेरणा जागृत करून तिला क्रांतिकारक स्वरूप सत्याग्रहाच्या रूपानें दिलें. या सत्याग्रही क्रांतिकारक आत्मप्रेरणेंतून भारतांत आज त्याच आत्मराज्याचा नवा आविष्कार होत आहे. आज या आविष्काराचें मूर्त स्वरूप "विकेंद्रित लोकशाही समाजवाद" ('Decentralised Democratic Socialism') असें होईल. आत्मराज्याचें अव्यक्त व शुद्ध स्वरूप दण्डहीन समाज हें असून त्याचें आजचें व्यक्त व निर्देश्य स्वरूप "विकेंद्रित लोकशाही समाजवाद" असें होईल असें मला वाटतें. या विकेंद्रित लोकशाही समाजवादाची अंतः-प्रेरणा सत्याग्रह ही असून त्याची प्रवृत्ति राजकीय पक्ष व राज्यसंस्था या दोहोंचाहि उत्तरोत्तर लोप व विलय करण्याकडे राहील. जितक्या प्रमाणांत ही सत्याग्रही जनशक्ति स्वयंपूर्ण व स्वावलंबी ग्रामराज्यें निर्माण करण्यांत प्रभावी बनेल तितक्या प्रमाणांत राजकीय पक्ष व राजदण्ड यांचा लोप व अस्त होत जाईल. आत्मवादी तत्त्वज्ञानांतून निर्माण होणाऱ्या "लोककारणा"चें अथवा सत्याग्रही प्रजाधर्माचें तत्त्वज्ञान व त्याचा व्यवहार यांच्या विकासाचा क्रम अशा प्रकारचा मला दिसतो. या क्रान्तिकारक प्रेरणेंतून निर्माण होणाऱ्या नवसमाजाला आकार देण्याच्या कार्यांत निरनिराळे राजकीय पक्ष कमी-अधिक प्रमाणांत भाग घेतील तथापि, हें क्रांतिकार्य कोणत्याहि विशिष्ट पक्षाचें कार्य न बनतां तें सर्व पक्षांचें समानकार्य बनावें यांतच भारतीय लोकशाहीचें उज्ज्वल भवितव्य सांठविलेलें आहे.

---

## 'आंदोलन' नव्हे, 'आरोहण'!

'आंदोलन' हा शब्द आमच्या कार्याकरितां फार लहान पडतो. आंदोलनाची गति झोक्यासारखी असते. आमचें तर 'आरोहण' आहे. थोडें चढल्यावर थोडें थांबावें लागतें. आजूबाजूचें दृश्य पहावें लागतें. मग त्यानंतर उंच चढणें होतें. एक गोष्ट आपण सारखी लक्षांत ठेवली पाहिजे, ती ही – "चरैवेति चरैवेति!" आचार, उच्चार, विचार, प्रचार, संचार – हे सर्व 'चर्' धातूपासूनच बनले आहेत. ह्याकरितांच "चरैवेति चरैवेति!" "अनिकेतः स्थिरमतिः भक्तिमान् मे प्रियो नरः।"

— आचार्य विनोबा ('सर्वोदय' आक्टोबर १९५४ अंकांतून)



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. वा. वि. मिराशी

# मत्तमयूर व गोलकी मठ

प्राचीन काळीं शैव संप्रदायाच्या अनेक शाखा भारतांत होत्या. त्यांपैकीं शैव, पाशुपत, कारुक (किंवा कारुणिक) सिद्धान्ती व कापालिक यांचा उल्लेख रामानुजादि आचार्यांनीं व शांकरभाष्याच्या टीकाकारांनीं केला आहे. यांपैकीं कारुक सिद्धान्तीविषयीं आपणांस विशेष माहिती नाहीं. कांहींच्या मतें त्यांना 'कालमुख' किंवा 'कालानन' असेंहि म्हणत. कालमुखांचा निर्देश कांहीं कोरीव लेखांतहि आढळतो. कापालिक संस्कृत वाङ्मयांत व क्वचित् कोरीव लेखांतहि दृष्टीस पडतात. भवभूतीच्या 'मालतीमाधवां'तील अघोरघंट व कपालकुंडला कापालिक-पंथाचे होते. इ. स. च्या सातव्या शतकांत होऊन गेलेल्या महेन्द्रविक्रमवर्मा नामक पल्लवनृपतीनें 'मत्तविलासप्रहसन' या संस्कृतनाटकांत कापालिकांच्या आचारांचें विडम्बन केलें आहे. पण या दोन मतांपेक्षां पाशुपत व शैव मतांचा प्रसार अधिक होता. पाशुपत-मताचा संस्थापक नकुलीश किंवा लकुलीश हा इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या आरंभीं गुजराथेंतील कायावतार किंवा कायावरोहण (हल्लींचें कारवाण) येथें होऊन गेला. या पाशुपत-मताचा प्रसार मुख्यत्वेंकरून गुजराथ, राजपुताना, कर्नाटक इत्यादि प्रदेशांत झाला होता. या पंथाच्या आचार्यांच्या नांवाच्या शेवटीं बहुधा 'राशि' हें पद आढळतें. चौथें शैव मत 'सिद्धान्तमत' या नांवानेंहि प्रसिद्ध होतें. या मताच्या आचार्यांना सैद्धान्तिक म्हणत. त्यांच्या नांवाच्या शेवटीं शिव किंवा शम्भु हें पद बहुधा असे. हें मत भगवान् शंकरांनीं स्वतः ब्रह्मदेवास दारुवनांत प्रथम उपदेशिलें व पुढें त्याचा सर्वत्र प्रसार झाला असें प्राचीन कोरीव लेखांत म्हटलें आहे. कांहीं लेखांत दुर्वास ऋषीला या मताचा पहिला आचार्य मानलें आहे. या शैवमताचा प्रचार भारतांतील अनेक प्रदेशांत झाला होता व देशपरत्वें त्याच्या शाखांस भिन्न भिन्न नांवेंहि प्राप्त झालीं होतीं. या पंथाची एक शाखा मध्यभारतांत इ. स. च्या नवव्या शतकांत स्थापन झाली. तिला **मत्तमयूर** असें नांव प्राप्त झालें. कालक्रमानें तिचा पुष्कळ विस्तार होऊन तिच्या उपशाखांनीं विन्ध्यप्रदेश, मध्यप्रदेश, ओरिसा, आन्ध्र, कोंकण इत्यादि दूरदूरचा प्रदेश व्यापला. या शाखेचे आचार्य केवळ धर्मोपदेशक नसून राजगुरूहि असत. त्यामुळें त्यांचा प्रभाव तत्कालीन राजकारणावरहि पडत असे. अलीकडील संशोधनावरून या मत्तमयूरशाखेचा बराचसा इतिहास ज्ञात झाला आहे. तो प्रस्तुत लेखांत संक्षेपानें देण्याचा प्रयत्न केला आहे.

या शाखेचे सर्वांत प्राचीन लेख मध्यभारतांतील पूर्वीच्या ग्वाल्हेर संस्थानांत सांपडले आहेत. त्या संस्थानांत नरवारच्या दक्षिणेस ४५ मैलांवर रणोद (प्राचीन रणिपद्र) नांवाचें खेडेगांव आहे. तेथील एका प्रासादसदृश प्राचीन मठांत एका विशाल शिळेवर कोरलेला लेख प्रसिद्ध पुरातत्त्वज्ञ कनिंग्हॅम याला आढळला. तो पुढें डॉ. कीलहॉर्न यानें प्रसिद्ध केला. या लेखांत या मत्तमयूरवंशाच्या स्थापनेची पुढील हकीकत दिली आहे :

"पूर्वी दारुवनामध्यें यज्ञानुष्ठान करून भक्तीनें आपणांकडे आलेल्या ब्रह्मदेवावर भगवान् शंकरांनीं अनुग्रह केला. त्याच्यापासून हा लोकोत्तर विशाल शाखांचा मुनिवंश उत्पन्न झाला. या वंशांत कदम्बगुहाधिवासी, नंतर त्याचा शिष्य शंखमठिकाधिपति, त्यानंतर तेरम्बिपाल व त्याचा शिष्य आमर्दकतीर्थनाथ असे आचार्य होऊन गेले. आमर्दकतीर्थनाथाचा शिष्य पुरन्दर नामक होता. तो उपेन्द्रपुरांत तपश्चर्या करीत असतां त्याची कीर्ति अवन्तिवर्मा नामक राजाच्या कानावर गेली. तेव्हां तो राजा स्वतः उपेन्द्रपुरास गेला व त्या आचार्यांची आराधना करून त्यानें त्याला मोठ्या प्रयत्नानें आपल्या राज्यांत आणलें. तेथें त्याच्या-

१ एपिग्राफिया इंडिका, पु. १, पृ. ३५१.



अनुक्रमणिका


राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कडून शैवपथाची दीक्षा घेऊन त्यानें त्याला गुरुदक्षिणा म्हणून आपलें सर्व राज्यैश्वर्य अर्पण केलें. त्या मुनीनें राजाकडून मत्तमयूर-नगरांत एक मेरुसदृश सुसमृद्ध असा मठ बांधविला. दुसरा एक मठ रणिपद्र येथ तपोवनांत बांधवून त्यानें त्याला मोठ्या प्रतिष्ठेप्रत पोंचविलें."

त्यानंतर या लेखांत रणिपद्र येथील आचार्यपरंपरा दिली आहे. मत्तमयूर शाखेचा संस्थापक पुरंदर याच्यापासून चौथ्या पिढींतील आचार्य व्योमशिव यानें रणिपद्र येथील मठाचा जीर्णोद्धार केला, देवालयें बांधिलीं व एक मोठी विहीरहि खोदविली. या सर्वांचें वर्णन त्या शिलालेखांत केलें आहे.

या शिलालेखांत कालनिर्देश नाहीं. तथापि मत्तमयूरमठाच्या स्थापनेचा काल अन्य प्रमाणांवरून सामान्यतः ठरवितां येतो. पुरंदरापासून पांचव्या पिढींतील आचार्य प्रभावशिव हा कलचुरि नृपति पहिला युवराजदेव ( इ. स. ९१५–९४५ ) याचा समकालीन होता हें पुढें दाखविलें आहे. प्रत्येक पिढी पंचवीस वर्षांची मानल्यास पुरन्दर इ स. ८०० च्या सुमारास होऊन गेला असावा असें म्हणतां येईल.

रणोद येथील लेखावरून मत्तमयूरशाखेचा पुरंदर हा मूळचा मध्यभारतांतला नसून तेथील अवन्तिवर्मा नामक राजाच्या प्रार्थनेवरून तो तेथें गेला होता हें उघड आहे. पुरन्दरापूर्वींच्या चार आचार्यांचीं नांवें न देतां त्या लेखांत त्यांना कदम्बगुहाधिवासी, शंखमठिकाधिपति, तेरम्बिपाल व आमर्दकतीर्थनाथ असें म्हटलें आहे.[२] त्यावरून ते कदम्बगुहा, शंखमठिका, तेरम्बि व आमर्दकतीर्थ येथें राहत होते हें उघड आहे. कलचुरींच्या एका लेखांतहि 'कदम्बगुहा अनेक सिद्धांचें निवासस्थान म्हणून पूज्य झाली आहे.' असें म्हटलें आहे.[३] पण तिचें निश्चित स्थान ठरविण्यास कांहीं माहिती मिळत नाहीं. शंखमठिका, तेरम्बि व आमर्दकतीर्थ यांच्या बाबतींतहि तीच स्थिति आहे. डॉ. कीलहॉर्ननें कदम्बगुहा म्हणजे रणोदजवळचें कद्वाहा व तेरम्बि म्हणजे तेरही असें अनुमान केलें होतें, पण रणोद येथील लेखावरून हीं गांवें अवन्तिवर्म्याच्या राज्यांत नसून दूरदेशीं होती असें दिसतें. या गांवाविषयीं आपणांस निश्चित माहिती मिळत नसली तरी पुरन्दर आचार्य ज्या उपेन्द्रपुरांत तपश्चर्या करीत होता त्याच्या स्थानाविषयीं अनुमान करण्यास साधन आहे. माळव्याचा परमारनृपति नरवर्मन् याच्या विक्रमसंवत् ११६७ ( इ. स. १११० ) च्या एका लेखांत उपेन्द्रपुरमण्डलाचा निर्देश आहे.[४] त्या मण्डलाच्या मन्दारक नामक प्रतिजागरणांतील ( परगण्यांतील ) कदम्बपद्रक नांवाचें गांव त्या ताम्रपटानें दान दिलें होतें. पुरंदर आचार्य जेथें तपश्चर्या करीत होता तें उपेन्द्रपुर माळव्यांतील उपेन्द्रपुरमण्डलाचें मुख्य नगर असण्याचा संभव आहे. या उपेन्द्रपुराचाहि स्थलनिश्चय अद्यापि झाला नाहीं. पण त्यांतील मन्दारक व कदम्बपद्रक हीं गांवें उज्जैनीच्या ईशान्येस १५ मलांवरचीं मन्देर व कमलीखेडा असावीं. तसें असल्यास मत्तमयूरवंशसंस्थापक पुरंदर व त्याचे गुरु व परमगुरु मूळचे माळव्यांतील होते व पुरंदर ग्वाल्हेर संस्थानांतील अवन्तिवर्मा-राजाच्या निमंत्रणावरून मत्तमयूर नगरास गेला असें म्हणतां येईल. या तर्काला उपोद्बलक असा उल्लेख नेपाळच्या म्यूझियमचे माजी क्यूरेटर डॉ. एस्. एन्. सेन यांनीं कांहीं वर्षांपूर्वीं आपल्या जवळच्या जुन्या 'पञ्जिका' नामक ग्रंथांतील उतारा मला पाठविला होता त्यांत मला सांपडला. हा ग्रंथ मत्तमयूर वंशाच्या ब्रह्मशम्भु नामक आचार्यानें इ. स. ९३६ या वर्षीं लिहिला होता. त्यांत आमर्दकाधीशाबद्दल ( म्हणजे आमर्दकतीर्थनाथाबद्दल ) खालील श्लोक आला आहे.

'श्रीमदामर्दकाधीशमायातमवनीतले ।
तच्छिष्याणां बहुत्वेऽपि कृतमालवकस्थितिम् ॥'

या श्लोकांत, आमर्दकाधीशाचे अनेक शिष्य असतांहि त्यानें मालवकामध्यें ( म्हणजे माळव्यांत ) वास केला होता असें म्हटलें आहे. या वर्णनावरूनहि पुरन्दरापूर्वींचे आचार्य माळव्यांत राहात होते असें दिसतें. अवन्तिवर्म्याच्या राज्यांत मठ स्थापल्यावर शैव आचार्यांनीं तेथील कांहीं स्थानांना माळव्यांतील पवित्र स्थलांचीं नांवें दिलीं असावीं. ओरिसा प्रदेशांत

२ ग्वाल्हेर म्यूझियमच्या लेखामध्यें याचें रुद्रशिव असें नांव दिलें आहे.
३ ए. इं., पु. १, पृ. २५९.
४. ए. इं., पु. २०, पृ. १०५.











राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सांपडलेल्या या पंथाच्या एका लेखांत उत्तरतेरम्बग्रहाचा उल्लेख आहे.[5] त्यावरून उत्तरतेरम्ब व दक्षिणतेरम्ब अशीं दोन स्थळें असून पहिलें ग्वाल्हेर संस्थानांत व दुसरें माळव्यांत होतें असें दिसतें. तसें असल्यास उत्तरतेरम्ब ( किंवा – तेरम्बि ) हें ग्वाल्हेर संस्थानांतील तेरही असेल.

उपेन्द्रपुराहून ज्या अवन्तिवर्मा-राजानें पुरन्दर आचार्यास आपल्या मत्तमयूर राजधानीस सन्मानपूर्वक बोलाविलें त्याच्याविषयीं जास्त माहिती रणोदच्या शिलालेखांत मिळत नाहीं. तथापि त्यासारखीं खालील नांवें त्रिपुरीच्या ( सध्याच्या जबलपूरजवळ असलेल्या तेवरच्या ) कलचुरि राजांच्या लेखांत नोहलाराणीच्या पूर्वजांच्या वर्णनांत आढळतात :[6]

सिंहवर्मा
|
सधन्व
|
अवनिवर्मा

अवनिवर्म्याची कन्या नोहला ही त्रिपुरींचा कलचुरि-नृपति पहिला युवराजदेव यास दिली होती. नोहलेनें व तिच्या पतीनें मत्तमयूर वंशाच्या कांहीं आचार्यांना आपल्या वाड्यांत बोलावून त्यांच्याकरितां शिवालयें व मठ बांधविले व त्यांच्या योगक्षेमाकरितां अनेक गांव दान दिले. नोहला ही स्वतः अवन्तिवर्म्याच्या वंशांतील असल्यास तिनें मत्तमयूरवंशाच्या आचार्यांसच कां बोलाविलें याची उपपत्ति लावतां येते. तेव्हां अवन्तिवर्मा व सिंहवर्मादि नोहलेचे पूर्वज हे एकाच राजवंशांतील होते असें अनुमान केल्यास तें बहुधा चूक होणार नाहीं.

नोहला चौलुक्यवंशांत जन्मली होती. या वंशाचें वणन करतांना बिल्हरी येथील शिलालेखांत म्हटल आहे कीं भरद्वाजपुत्र द्रोणाचार्य यांनीं द्रुपदराजाला शाप देण्याकरितां चुलुकांत घेतलेल्या पाण्यापासून एक वीर-पुरुष उत्पन्न झाला. त्याच्या वंशाला चौलुक्य असें नांव प्राप्त झालें. पुरन्दर आचार्यांचा समकालीन याच चौलुक्यकुलांतील असावा. तो सिंहवर्म्याचा पूर्वज दिसतो. कदाचित् तो त्याचा पिता किंवा पितामह असेल. या वंशांतील आणखी कांहीं राजे भिलसा जिल्ह्यांतील मासेर गांवीं सांपडलेल्या शिलालेखांत उल्लेखिले होते. तो लेख आतां भग्न झाला आहे तथापि त्यांत नरसिंह व केसरी हीं नांवें स्पष्ट दिसतात. या लेखांत या वंशाचें नांव शुल्की असें दिलें आहे व तो वंश ब्रह्मदेवाच्या अंजलींतून पडलेल्या जलबिंदूपासून उत्पन्न झालेल्या भारद्वाज ऋषीपासून निघाला असें म्हटलें आहे. शुल्की हें ' चौलुक्य ' याचेंच अपभ्रष्ट रूप दिसतें. तेव्हां मासेर येथील लेखांतील नरसिंह, केसरी वगैरे राजे अवन्तिवर्म्याच्याच कुळांतील होते असें मानण्यास हरकत नाहीं. या कुलाचें राज्य मध्य-भारतांत रणोद–भिलसा या प्रदेशावर होतें असें दिसतें.

अवन्तिवर्म्याची राजधानी मत्तमयूर ही कोठें होती हें अद्यापि निश्चित झालें नाहीं. ग्वाल्हेर-संस्थानांत शिवपुरीच्या दक्षिणेस, २५–३० मैलांच्या परिसरांत, सुरवाया, रणोद ( प्राचीन रणिपद्र ), महुआ (प्राचीन मधुमती), कद्वहा, तेरही इत्यादि गावांत या पंथाचे इ. स. च्या दहाव्या शतकांतील शिलालेख आणि देवालयें, मठ व तलाव दृष्टीस पडतात. तेव्हां या भागांतच मत्तमयूरनगर असलें पाहिजे यांत संशय नाहीं. या सर्व ठिकाणांत कद्वाहा हें गांव प्राचीन देवालयांबद्दल विशेष प्रसिद्ध आहे. तेथें अद्यापि चौदा-पंधरा देवालयांचे अवशेष दृष्टीस पडतात. या देवालयांचें स्थापत्य व शिल्पकाम अत्युत्कृष्ट आहे. त्यामुळें "कद्वाहा हें ग्वाल्हेर संस्थानांतीस खजूरहो किंवा भुवनेश्वर म्हणण्यास हरकत नाहीं" असें ग्वाल्हेर संस्थानच्या पुरातत्त्वखात्याचे माजी संचालक श्री. मो. ब. गर्दे म्हणतात.[8] अशीं देवालयें व मठ दीर्घकालीन राजाश्रयाशिवाय बांधलीं जाणें शक्य नाहीं तेव्हां कद्वाहा हें प्राचीन मत्तमयूरनगर असण्याचा संभव आहे.

मत्तमयूरवंशांतील आचार्यांची परंपरा ग्वाल्हेर विन्ध्यप्रदेश व मध्यप्रदेश या भागांत सांपडलेल्या

५. ए. इं., पु. २४, पृ. २४२.
६ बिल्हरी येथील शिलालेख ( ए. इं., पु. १, पृ. २५८ ) पहा.
७ ग्वाल्हेर पुरातत्त्वखात्याचा १९३०–३१ चा वार्षिक अहवाल, पृ. १०.
८ आर्किऑलॉजी इन् ग्वाल्हेर, पृ. ९५.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोरीव लेखांवरून खालीलप्रमाणें जुळवितां येतें.[१]

याशिवाय बिल्हरीशिलालेखांत मत्तमयूरवंशाच्या खालील आचार्यांचा उल्लेख आहे पण त्यांचें वरील वंशावळींतील निश्चित स्थान माहीत नाहीं.

पवनशिव
( माधुमतेय )
।
शब्दशिव
।
ईश्वरशिव

वर दिलेल्या मोठ्या वंशावळींतील पहिले चार आचार्य माळव्यांत निरनिराळ्या ठिकाणीं रहात होते हें मागें सांगितलें आहेच. पुरन्दर यानें मत्तमयूर व रणिपद्र ( रणोद ) येथें मठ स्थापले. कवचशिवापासून पतङ्गशंभूपर्यंतचे आचार्य रणिपद्र येथील मठाचे अधिपति होते. सदाशिवाचा शिष्य ( दुसरा ) पुरन्दर यास माधुमतेय म्हटलें आहे तेव्हां तो मधुमती ( महुआ ) येथील मठाचा आचार्य होता असें दिसतें. चूडाशिवाच्या शिष्यांस त्रिपुरीच्या कल्चुरि राजांनीं आपल्या राज्यांत बोलावून त्यांच्याकरितां शिवालयें व मठ बांधविले व त्यांच्या योगक्षेमाकरितां अनेक गांव दान दिले. कल्चुरिनृपति पहिला युवराजदेव यानें प्रभावशिव आचार्यास, त्याची राणी नोहला हिनें ईश्वरशिवास व त्यांचा पुत्र लक्ष्मण-

१






अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

राजदेव यानें हृदयशिवास चेदिदेशांत (सध्यांच्या बघेलखंडांत) बोलावून त्यांचा यथोचित सन्मान केला होता व त्यांस तपश्चर्येकरितां मठ बांधून दिले होते त्यांचें वर्णन कलचुरींच्या शिलालेखांत आलें आहे.

या मत्तमयूरवंशीय आचार्यांचेहि कांहि लेख चेदिदेशांत सांपडले आहे. विन्ध्य प्रदेशांतील गुर्गी[10] व चन्द्रेहे[11] येथील लेखांत प्रभावशिव, प्रशान्तशिव, ईशानशम्भु व प्रबोधशिव या आचार्यांचें सच्चारित्र्य, तपश्चर्या, विद्वत्ता इत्यादिकांचें वर्णन असून त्यांनीं बांधलेलीं देवालयें, त्यांतील मूर्ति, देवालयांना जोडलेले मठ यांचेंहि सविस्तर वर्णन आलें आहे. गुर्गी येथें प्रशान्तशिव आचार्यानें श्रीशंकराचें उत्तुंग देवालय बांधलें होतें त्याचे अवशेष एका विशाल टेकडीच्या रूपानें तेथें दिसतात. त्या देवालयांत बसविलेली हरगौरीची सुंदर जोडमूर्ति अद्यापि तेथें टेकडीवर पडली आहे. तिची रुंदी ४ फूट ७ इंच व उंची १२ फूट ८ इंच आहे. ज्या देवालयांत ही मूर्ति बसविली होती तें जवळजवळ १०० फूट उंचीचें असावें असा कनिंग्हॅमचा तर्क होता. हें देऊळ सुस्थितींत होतें तेव्हां त्याच्या शिखराचा अग्रभाग सभोंवारच्या भूमीपासून निदान १५० फूट उंच असावा असें कै. राखालदास बॅनर्जी यांनीं म्हटलें आहे. याच्या समोरचें तोरण आतां रेवाच्या महाराजांच्या राजवाड्यासमोर उभारलें आहे. त्यावर शिवचरित्रांतील कांहीं प्रसंग सुन्दर रीतीनें कोरले आहेत. या देवळाजवळ कलचुरिनृपति पहिला युवराजदेव यानें बांधलेलें शिवालय होतें असा गुर्गी येथील शिलालेखांत उल्लेख आहे. तें याहिपेक्षां उंच असावें. कलचुरि राजांनीं मत्तमयूरपंथाच्या आचार्यांच्या तपश्चर्येकरितां प्रशांत स्थलीं मठ बांधून दिले होते. अशा मठाचे अवशेष पूर्वीच्या रेवा-संस्थानांत शोण नदीच्या कांठीं चन्द्रेहे येथें अद्यापि दृष्टीस पडतात. तेथील शिलालेखांत त्या मठाचें खालील वर्णन आलें आहे :

'जडतरमरुच्छोणस्याम्भःकणैरयमाश्रमो
मृगपतिमहाध्वानै रात्रौ प्रतिध्वनिताम्बरः ।
शिखरिशिखरप्रान्तप्रेङ्खद्द्विरेफपयोधरो
जनयति जने विद्युच्छ्ङ्कां महौषधिरोचिषा ॥'

'या आश्रमांत शोणनदीच्या तुषारांनीं शीतल असा वारा वाहत असतो. येथें रात्रीं सिंहाच्या घोर गर्जनांनीं आकाश दुमदुमून जातें. सभोंवारच्या टेंकड्यांवर भ्रमरांसारखे काळे ढग इतस्ततः भ्रमण करीत असतां येथील औषधींच्या लखलखाटामुळें लोकांना विजा चमकताहेत काय अशी भ्रान्ति होते.'

मत्तमयूरवंशाचे उल्लेख मध्यभारत, विन्ध्यप्रदेश व मध्यप्रदेश यांखेरीच इतर प्रदेशांतील कोरीव लेखांतहि क्वचित् आढळतात. कोंकणांत रत्नागिरि जिल्ह्यांतील खारेपाटण या गांवीं सांपडलेल्या ताम्रपटांत शिलाहारवंशी रट्टराजानें मत्तमयूरवंशाच्या कर्करोणी शाखेंतील आचार्य अम्भोजशिव याच्या आत्रेय नामक शिष्यास अव्वेश्वरदेवाच्या पूजेकरितां कांहीं गांवें दान दिल्याचा निर्देश आहे.[12] तसेंच ओरिसांतील पूर्वीच्या पटणा संस्थानांत राणीपूर झरियाल या गांवीं उत्तरतेरम्बगृहाच्या गगनशिव नामक आचार्यानें देवालय बांधल्याचा उल्लेख तेथें सांपडलेल्या शिलालेखांत आला आहे. यासारख्या उल्लेखांवरून मत्तमयूरवंशाचे आचार्य मध्यभारतांतील आपल्या मूळ पीठापासून शेंकडों कोस दूर जाऊन मठ व देवालयें बांधीत व आपल्या धार्मिक मतांचा प्रचार करीत असें दिसतें.

कलचुरि राजांची राजधानी त्रिपुरी (जबलपुरापासून सहा मैलांवरचें तेवर) येथें होती. तिच्या जवळच नर्मदानदीच्या कांठीं जलप्रपातामुळें रम्य झालेल्या जागीं एका लहानशा टेंकडीवर चौसष्ट योगिनींचें वर्तुलाकार छप्पररहित (hypaethral) देवालय आहे. या देवालयांतील योगिनींच्या पांच मूर्ती कुशाणकालीन म्हणजे इ. स. च्या दुसऱ्या–तिसऱ्या शतकांतील आहेत. पण बाकीच्या सर्व त्यांच्या पादपीठावरील नांवांच्या अक्षरवटिकेवरून कलचुरि नृपति पहिला युवराजदेव याच्या काळच्या इ. स. च्या दहाव्या शतकांतील दिसतात. त्यांवरून त्याच्या काळीं या देवालयाची स्थापना झाली असावी असें दिसतें. या टेंकडीचा आकार गोल असल्यानें त्याच्या जवळच्या शैवाचार्यांच्या मठाला **गोलकी मठ** असें नांव प्राप्त झालें. इ. स. च्या दहाव्या शतकानंतर मध्यभारतांतील

१० ए. इं., पु. २२, पृ. १२७.
११ ए. इं., पु. २१, पृ. १४८.
१२ ए. इं., पु. ३, पृ. २९५.



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

चौलुक्य वंशाचा लोप झाल्यावर मत्तमयूर वंशाला उतरती कळा आली. त्यानंतर त्या मठाचे उल्लेख कोरीव लेखांत येत नाहींत. पण त्या वंशाच्या आचार्यांनीं त्रिपुरीजवळ स्थापलेला गोलकीमठ मात्र उत्तरोत्तर वृद्धिंगत होत गेला. आन्ध्र प्रदेशांतील गुंटूर जिल्ह्यांत मलकापुरम् येथें गोलकीमठाच्या विश्वेश्वरशम्भु नामक आचार्यांचा शके ११८३ चा लेख सांपडला आहे त्यांत गोलकीमठाविषयीं खालील माहिती आली आहे[१३] :

‘अस्ति विश्वंभरासारः कमलाकुलमन्दिरम् ।
भागीरथीनर्मदयोर्मध्ये डहलमंडलम् ॥
उग्रं तत्र तपश्चरन्नियमयन् ब्राह्मेन्द्रियक्रीडनं
सान्द्रानन्दमये समाधिसमये चित्तेन लीनः शिवे ।
नीत्वा कालमनन्तमन्तकजयी सद्भावशम्भुर्गुरुः
दुर्वासोऽन्वयसम्भवः सुचरितः प्राबुद्ध पुण्यैर्नृणाम् ॥
शैवानाम्प्रथमाय शङ्करपदध्यानामृताम्भोनिधि-
क्रीडाम्रेडनकर्मनिर्मलतरस्वान्ताय शान्तात्मने ।
तस्मै निःस्पृहचेतसे कलचुरिक्ष्मापालचूडामणि-
र्ग्रामाणां युवराजदेवनृपतिर्भिक्षां त्रिलक्षीं ददौ ॥
कृत्वा स शैवमुनिरद्‌भुतशीलमूर्तिः
श्रीगोलकीमठमुदारमुदात्तचित्तः ।
तस्याकरस्य नृपदेशिकमौक्तिकानां
वृत्तिं चकार सकलामपि तां त्रिलक्षीम् ॥ ’

वरील उताऱ्यांत म्हटलें आहे कीं भागीरथी व नर्मदा नद्यांमध्यें डहल ( किंवा डाहल ) मण्डल आहे; त्यामध्यें दुर्वास ऋषींच्या वंशांत सद्भावशम्भु नामक मुनि होऊन गेला. त्याला कलचुरिनृपति युवराजदेव यानें तीन लक्ष ग्रामांची भिक्षा घातली. त्या निःस्पृह आचार्यानें गोलकीमठाची स्थापना करून त्याच्या योगक्षेमाकरितां ते सर्व तीन लक्ष गांव लावून दिले.

चेदिदेशाला डाहलमंडल असेंहि नांव होतें. त्यांतील ग्रामांची संख्या नऊ लाख धरली जात असे. वरील वर्णन खरें असल्यास युवराजदेवानें आपल्या राज्याचा एक तृतीयांश भाग गोलकीमठाला दान केला असें मानलें पाहिजे.

या गोलकी-मठाचे आचार्य कलचुरि राजांचे राजगुरु असत. त्यांचे उल्लेख त्यांच्या स्वतःच्या कोरीव लेखांत त्याचप्रमाणें कलचुरि राजांच्या ताम्रपटांतहि येतात. त्यावरून खालील वंशावळ तयार करतां येते :

| शैव आचार्य | समकालीन कलचुरिनृपति |
|---|---|
| विमलशिव | |
| \| | |
| वास्तुशिव | |
| \| | |
| पुरुषशिव | यशः कर्ण |
| \| | |
| शक्तिशिव | गयाकर्ण |
| \| | |
| कीर्तिशिव | नरसिंह |
| \| | |
| विमलशिव | जयसिंह |

पहिल्या दोन आचार्यांच्या समकालीन कलचुरि राजांचीं नांवें शिलालेख अस्पष्ट झाल्यामुळें आतां नष्ट झालीं आहेत.

गोलकी मठाची कीर्ति दूरवर पसरली होती. त्यामुळें दूरदूरच्या देशांतून लोक दीक्षा घेण्याकरितां तेथें येत. विमलशिव हा केरल देशाहून तर त्याचा प्रशिष्य विश्वेश्वरशम्भु हा गौड देशांतील दक्षिणराढमधून त्रिपुरीला आला होता. कलचुरि राजे या राजगुरूंचा सल्ला महत्त्वाच्या राजकारणांत घेत असत. विमलशिव आपल्या सल्लामसलतीनें दूरदूरच्या लोकांनाहि वश करून जवळ आणीत असे असें वर्णन जबलपूरच्या शिलालेखांत केलें आहे.[१४] जयसिंह नृपति त्याला अनुरूप अशा अनेक राजकार्यांत नियुक्त करीत असे, तरी त्यानें आपलीं नित्य–नैमित्तिक धार्मिक कृत्यें करण्यांत कधींहि आळस केला नाहीं असें त्याच लेखांत म्हटलें आहे.

जयसिंहाचा पुत्र विजयसिंह याच्या कारकीर्दींत इ. स. १२१०च्या सुमारास चंदेल्ल नृपति त्रैलोक्यमल्ल यानें कलचुरींचा पाडाव करून त्यांचें राज्य हस्तगत केलें. त्यानंतर गोलकी मठाला उतरती कळा लागली. त्या मठाचे आचार्य दक्षिणेंत आन्ध्र व मद्रास प्रदेशांत

१३. ‘आन्ध्र हिस्टॉरिकल रीसर्च सोसायटी’चें जर्नल, पु. ४, पृ. १४७.
१४. ए. इं., पु. २५, पृ. ३१४.






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

जाऊन तेथें मठ स्थापूं लागले. गोलकी मठाच्या स्थापनेला कारणीभूत झालेल्या युवराजदेवाच्या उदार देणगीचें स्मरण ठेवण्याकरितां हे आचार्य आपणांस 'लक्षाध्यायी सन्तान' किंवा 'भिक्षामठाचे आचार्य' असें म्हणवीत असत. दक्षिणेंत कुडाप्पा, कर्नूल, गुंटूर, दक्षिण अर्काट इत्यादि जिल्ह्यांत गोलकी मठाच्या शाखा होत्या. त्यांचे उल्लेख दक्षिणेंतील अनेक कोरीव लेखांत येतात.

या शैवमठांचा उपयोग लोकांच्या कल्याणाकरितां केला जात असे. मठांना जोडून व्याख्यानशाला असत. त्यामध्यें आचार्यांचीं धार्मिक प्रवचनें होत. तशींच मठांचीं अन्नसत्रें असत. त्यांमध्यें गोरगरीबांना अन्नसन्तर्पण होई.

या मठांची कार्यव्यवस्था कशी असे, राजे व धनिक लोक यांच्याकडून मिळालेल्या धनाचा कसा विनियोग होई, मठाकडून लोककल्याणाच्या कोणत्या संस्था चालविल्या जात याचें सविस्तर वर्णन मागें उल्लेखिलेल्या मलकापुरमूच्या स्तम्भलेखांत केलें आहे.

या लेखांत गोलकीमठाचा आचार्य विश्वेश्वरशम्भु यानें वारंगळचा काकतीय नृपति गणपति व त्याची कन्या रुद्राम्बा यांनीं दिलेल्या दोन गांवांचा जो विश्वेश्वरगोलकि नामक अग्रहार केला होता त्यांतील व्यवस्थेचें वर्णन केलें आहे. विश्वेश्वरशम्भु हा गोलकीमठाच्या कीर्तिशिवाचा शिष्य धर्मशम्भु याचा शिष्य. तत्कालीन चोल, परमार, कलचुरि व काकतीय राजे याचे शिष्य होते. काकतीय राजांकडून मिळालेल्या गांवांचा अग्रहार करून त्यानें त्यांत देवालय, मठ, पाठशाला, अन्नसत्र, प्रसूतिशाला व आरोग्यशाला (दवाखाना) बांधल्या. त्यानें तेथें साठ द्राविडी ब्राह्मणांच्या कुटुंबांना बोलावून त्यांच्या योगक्षेमाकरितां जमिनी लावून दिल्या. अग्रहार गांवांतील राहिलेल्या जमिनीचे तीन भाग करून त्यांतील एका भागाचें उत्पन्न शिवालयाच्या व्यवस्थेकरितां, दुसऱ्याचें पाठशाळा व शैवमठ यांच्याकरितां व तिसऱ्याचें प्रसूतिशाला, आरोग्यशाला व अन्नसत्र यांच्याकरितां खर्च करावयाचें असे. पाठशालेंत तीन अध्यापक ऋग्वेद व सामवेद यांच्या अध्यापनाकरितां व पांच, तर्क, साहित्य व शैवागम यांचें शिक्षण देण्याकरितां नेमले जात. शिवालयाच्या सेवेकरितां नर्तिका, गायिका व वादक असत. अन्नसत्राकरितां दोन ब्राह्मण आचारी, सहा वाढपी व चार परिचारक नेमले होते. अग्रहाराच्या संरक्षणाकरितां वीरभद्र व वीरमुष्टि नामक रक्षक (पोलीस) होते. यांशिवाय अग्रहारांतील व्यावहारिक जीवनाला आवश्यक असे सोनार, सुतार, लोहार, तांबट, बुरूड, कुंभार, न्हावी वगैरेंची वस्ती केली होती. विश्वेश्वरशंभूनें दक्षिणराढांतील आपल्या पूर्वग्रामांतून कांहीं ब्राह्मणांस आणून त्यांच्याकडे अग्रहाराच्या जमाखर्चावर देखरेख करण्याचें व हिशोब ठेवण्याचें काम सोंपविलें होतें. मठाच्या या सर्व सेवकांना त्यांच्या उपजीविकेकरितां जमिनी दिल्या होत्या.

याशिवाय शैव, कालानन (कालमुख) व पाशुपत पंथांच्या आचार्यांच्या अन्नवस्त्रांकरितां, पाठशालेत शिकणाऱ्या विद्यार्थ्यांकरितां व अन्नसत्राच्या खर्चाकरितां जमिनी राखून ठेवल्या होत्या. अग्रहारगांवांत बाहेरून येणाऱ्या चांडालादि सर्वांस भोजन मिळे.

देवालय, मठ, अन्नसत्र वगैरेंची व्यवस्था तेथील आचार्यांच्या देखरेखीखालीं चाले. अग्रहारांतील सर्व शैवपंथीयांनीं आचार्याची निवड करावयाची असे. तो सद्वर्तनी, विद्वान् व शैवमतांत प्रवीण असला पाहिजे अशी अट असे. त्याच्या कामाबद्दल त्याला शंभर निष्कांची वृत्ति होती. पूर्वीं नेमलेला आचार्य दुर्वर्तनी निघाला किंवा आपल्या कर्तव्याचरणांची उपेक्षा करूं लागला तर त्याला काढून दुसऱ्यास नेमण्याचा अधिकार अग्रहारांतील सर्व शैवपंथीयांच्या सभेस दिला होता.

मत्तमयूर व गोलकीमठाचे आचार्य सामान्यतः सच्चारित्र्यवान्, विद्वान्, निःस्पृह व संयमी असत. ते आपल्या व इतर पंथीय तत्त्वज्ञानाचा अभ्यास करीत. त्यांपैकीं कांहींनीं उत्कृष्ट ग्रंथरचनाहि केली आहे. रणिपद्र येथील मत्तमयूरपंथाच्या व्योमशिवाचार्यानें 'व्योमवती' नामक टीका वैशेषिकसूत्रांवरील प्रशस्तपादभाष्यावर लिहिली आहे. त्या भाष्यावरील सर्व उपलब्ध टीकांत ही प्राचीन आहे. हिचा काळ पूर्वीं अनिश्चित होता, पण ग्वाल्हेर म्यूझियममधील लेखांतील व्योमशिवाचार्याविषयींच्या खालील श्लोकानें आतां याबाबतींत संदेह राहत नाहीं :[१५]

१५ ग्वाल्हेरचा शिलालेख अद्यापि पूर्णपणें प्रसिद्ध झाला नाहीं. तथापि त्याचा छाप त्या म्यूझियमच्या अधिकाऱ्यांनीं मजकडे पाठविला त्यावरून हा श्लोक दिला आहे.



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

'मूनिसूर्येण निरस्तं टीकालोकेन येन लोकस्य ।
प्रकटयतेह् पदार्थं सन्तमसच्च सन्तमसम् ॥'

"ज्याप्रमाणें सूर्य पदार्थांना प्रकट करून जगांतील दाट अन्धकार नाहींसा करतो त्याप्रमाणें या व्योमशिवानें आपल्या टीकेच्या योगें वैशेषिक तत्त्वज्ञानांतील सत्य पदार्थांचें स्वरूप स्पष्ट केलें आहे व असत्य अज्ञान नष्ट केलें आहे."

गोलकीमठाच्या सोमशंभु आचार्यांनें सर्व शैव-आगमांचें विवरण करणारा सोमशम्भुपद्धति नामक ग्रंथ लिहिला होता असें मलकापुरमूच्या स्तम्भलेखांत म्हटलें आहे. सायणमाधवांच्या 'सर्वदर्शनसंग्रहा'त शैवदर्शनाची माहिती देत असतांना सोमशंभूचे कांहीं श्लोक उद्धृत केले आहेत ते याच पद्धतींतून घेतले असावेत. याशिवाय ब्रह्मशम्भूची 'मज्जिका' यासारखे कित्येक ग्रंथ अद्यापि अज्ञात किंवा अप्रकाशित आहेत.

याप्रमाणें मत्तमयूर व गोलकी मठांच्या आचार्यांनीं प्राचीन भारतांत धर्म, तत्त्वज्ञान, राजकारण, समाजसेवा इत्यादि क्षेत्रांत महनीय कामगिरी केली होती.

पत्रव्यवहार

# बहुजनसमाजाचें भाषिक धन : दोन विचार

'नवभारत'च्या सप्टेंबर '५४ च्या अंकांत डॉ. ग. त्रा. तगारे यांचा 'बहुजन-समाजाचें भाषिक धन' या शीर्षकाखालीं एक मननीय आणि विचारणीय लेख प्रसिद्ध झाला आहे. लेखकांनीं त्या लेखाच्या सुरुवातीच्या वाक्यांतच लेखाचें सार समाविष्ट केलेलें आहे. तें 'लेखभाषा व बहुजनसमाजाची भाषा यांच्यामधील अंतर कमी करण्यासाठीं बहुजनसमाजाच्या भाषेचा साहित्यिक भाषेंत अधिकाधिक उपयोग झाला पाहिजे' हें होय. सर्व सुबुद्ध जनतेनें या विषयाचा विचार करावा असें आवाहन करण्यांत लेखकाची या विषयाबद्दलची तळमळ व्यक्त होते. या विषयाबाबत कांहीं शंकांचें निरसन व्हावें व कांहीं मुद्द्यांची दुसरी बाजूहि स्पष्ट व्हावी या अभ्यासू हेतूनें दोन पुढील विचार मांडीत आहे.

बहुजनसमाज या शब्दानें जो समाज किंवा समाजांतील जो थर अभिप्रेत होतो त्याचें स्वरूप परिस्थिति-सापेक्ष आहे. अल्पजनसमाज हा सुशिक्षित नि सुविद्य आणि बहुजनसमाज अशिक्षित नि अज्ञानी असें स्वरूप सर्वत्र आढळतें. सामाजिक रचना जोंपर्यंत आर्थिक समतेवर उभारलेली नाहीं, शिक्षणानुकूल अशी आर्थिक बैठक समाजास प्राप्त झालेली नाहीं तोंपर्यंत शैक्षणिक प्रमाणहि एकंदरीनें विषमच आढळणार. केवळ आर्थिक समते-विषमतेचाहि हा प्रश्न नाहीं. कालाच्या प्रवाहांत समाजावर घडणारे सांस्कृतिक परिणामहि विचारांत घ्यायला हवेत. संस्कारांनीं समाजाची घडण होत जाते. समाजास सुशिक्षित होण्यास सुसंस्कार फार मोठें साहाय्य करतात. या निकषावर बहुजनसमाजाची असंस्कारित बोली घासून पाहिली तर ती लेखभाषेंत वापरणें योग्य ठरणार नाहीं.

प्रौढ-मतदान-पद्धतीमुळें जनता सार्वभौम सत्तेचें अधिष्ठान झाली ही गोष्ट जेवढ्या अर्थानें खरी, तेवढ्याच अर्थानें प्रौढशिक्षणाच्या व सक्तीच्या शिक्षणाच्या वाढत्या प्रसारामुळें ती शिक्षित होण्याच्या मार्गावर आहे ही गोष्टहि खरी. अर्थात् जसा आज सुशिक्षित असणाऱ्या अल्पजनसमाजाला या अवस्थेप्रत येण्यास कालावधि लागला, त्याप्रमाणें बहुजनसमाजहि सुशिक्षित होण्यास बराच अवधि लागेल. आणि मग शैक्षणिक-दृष्ट्या बहुजनसमाज व अल्पजनसमाज असे दोन वर्गहि राहणार नाहींत. शैक्षणिक वाढीची सामाजिक गरज ज्या प्रमाणांत भागविली जाईल, किंबहुना भागवून घेतली जाईल त्या प्रमाणांत बोलभाषा नि लेखभाषा यांच्या सीमारेषा परस्परांत मिळून जातील.

राजकीय आणि शैक्षणिक जागृति जशी होत जाईल, वर्तमान आणि भविष्यकालांत बहुजनसमाज जसजसा सुशिक्षित होत राहील, तसतशी शैक्षणिक मनोभूमिकाहि तयार होईल. आजच्या अल्प सुशिक्षितांची जी मानसिक बैठक तीच उद्याची सामुदायिक मनोऽवस्था होय. व्यक्ति ही जेव्हां वाचकाच्या भूमिकेंत असते तेव्हां तिच्या मनाची एक विशिष्ट बैठक तयार झालेली असते. त्या मनाचें किंवा मानसिक अवस्थेचें आपण विश्लेषण केलें तर असें आढळून येईल कीं, तिला हलकें, निकृष्ट असें कांहीं चालणार नाहीं. बहुश्रुत मनाची ही पातळी खालच्या थरास परत जाणें शक्य नाहीं नि इष्टहि नाहीं. लेखभाषेंत ग्रथित झालेले मौलिक विचार हे कांहीं उंच पातळीचे असल्यानें विशिष्ट परिभाषेचा साज घेऊनच व्यक्त होतात. यांत शैलीचा वृथाभिमान नाहीं. भाषेची स्वतःसिद्ध व्यक्त होण्याची विशिष्ट पद्धति म्हणजे शैली. शैलींत स्वयंस्फूर्तता अनुस्यूत आहे. जडण-घडण नव्हे.

— भाऊ धोंगडे









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. ना. ल. वैद्य

# इंग्लंडमधल्या पब्लिक स्कूल्स्‌चें भवितव्य

१७६५ सालीं ब्रि०-साम्राज्याची मुहूर्तमेढ हिंदुस्थानांत रोंवणाऱ्या रॉबर्ट क्लाईव्हची, १५६१ सालीं सुरूं झालेली 'मर्चण्ट टेलर्स्' ही शाळा पाहात असतां अनेक विचार माझ्या मनांत येत होते. आम्ही ज्या खोलींत बसलों होतों, तेथें शाळेच्या माजी विद्यार्थ्यांचे फोटो लावलेले होते. कुणी नंतर लॉर्ड् झाले होते, कुणी लाटसाहेब, सर साहेब इत्यादि. आमच्या दिमतीस असणारे त्या शाळेंतील एक शिक्षक मला क्लाईव्हच्या फोटोकडे बोट दाखवून म्हणतात: "याच शाळेचे माजी विद्यार्थी–" मी म्हणालों–"होय का! मग, त्या काळीं या शाळेची लायकी काय असली पाहिजे याची सहज कल्पना होऊं शकते–" (–क्लाईव्ह हा अत्यंत उनाड पोरगा होता आणि शालेय शिक्षणहि त्यानें पुरें केलें नाहीं–). इंग्रज लोक हे अत्यंत देशाभिमानी असल्यानें, आणि हिंदुस्थानावर त्यांनीं जें राज्य केलें तें हिंदुस्थानच्या कल्याणासाठींच होय अशी त्यांची बालंबाल खात्री झालेली असल्यामुळें, माझा विनोद सदरहू शिक्षकास रुचला नाहीं, व त्यानें लगेच आम्हांला मुख्याध्यापकांच्या खोलींत (–खोली शब्द चूक आहे. प्रशस्त हॉलच म्हटला पाहिजे–) नेलें. मुख्याध्यापकांनीं आमच्याशीं अर्धाएक तास चर्चा केली व आमच्यापैकीं प्रत्येकाच्या दिमतीस एकेक शिक्षक देऊन, शाळा पाहण्यास आम्हांला पाठविलें. आम्ही बहुतेक वर्गांतून हिंडलों, अध्यापन बघितलें, ऐकलें; लॅबोरेटरी, इतिहास–भूगोल यांच्या खास खोल्या, बालवीर पथकांचा मोठा हॉल, बॅन्डपथक, व्यायामहॉल, चर्च, पोहण्याचा तलाव (त्या दिवशीं थंडी भयंकर होती, त्यामुळें चिरेबंद बांधलेल्या त्या तलावांत सहा फूट बर्फाचा जाड थर होता, आणि त्यावर मुलें बेधडक स्केटिंग करीत होतीं!), शुश्रूषा-खोली इ० सर्व कांहीं पाहिलें–मनाला समाधान वाटलें. काय नव्हतं या शाळेंत? विद्वान् व तन्मयतेनें शिकविणारे शिक्षक (–या शाळेंतल्या शिक्षकांचा पगार सरकारी शाळेंतल्या शिक्षकांपेक्षां जास्त असतो–), विस्तीर्ण क्रीडा–मैदानें, सर्व प्रकारची साधनसामग्री! या शाळेंत आपल्या मुलानें शिकावें असें कोणत्या आईबापास वाटणार नाहीं?—जरूर वाटेल, नव्हे, वाटेलच! या खाजगी पब्लिक स्कूल्स्‌मधून आपल्या मुलांनीं शिक्षण घ्यावें अशी महत्त्वाकांक्षा आईबापांची असते, त्यासाठीं स्वार्थत्यागहि ते करतात. कारण पब्लिक स्कूलमध्यें सरासरीनें सालीना खर्च तीनशें पौंड म्हणजे चार हजार रुपये येतो! याचसाठीं, या शाळा मानाच्या समजल्या जातात! (आपले नेहरु अशाच एका शाळेंत 'हॅरो' मध्यें शिकत होते.) याचसाठीं, 'पब्लिकस्कूल'चं भाषांतर मी '**मानशाला**' असें करीत आहे.

### लांब खोलवर रुजलेलीं मुळें

या मानशालेसंबंधीं जेव्हां कोणी लिहितो, तेव्हां तो आदरानें किंवा बिचकूनच लिहितो, असं म्हटलं तर अतिशयोक्ति होणार नाहीं. कारण, या मानशालांचा इतिहास सहाशें वर्षांइतका जुना आहे. पहिली मानशाला १३८२ मध्यें उघडली गेली, ती विल्यम् नांवाच्या माणसानें विंचेस्टर येथें. दुसरी, १५४० मध्यें ईटन या गांवीं. तत्पूर्वी, १५१२ मध्यें सेंट पॉल्स्, १५३३ मध्यें खाईस्ट्स् हॉस्पिटल सुरुं झालेल्या होत्याच. १५६० मध्यें वेस्टमिन्स्टर, १५६१ मध्यें मर्चण्ट टेलर्स्, १६११ त चार्टरहाऊस–इत्यादि मानशाला अस्तित्वांत आल्या. मी यादी त्यांच्या सनांनिशीं मुद्दाम दिली, याचं कारण, या मानशालांचा इतिहास किती जुना आहे व त्यांची पाळेंमुळें किती खोलवर रुजलीं आहेत हें वाचकांच्या ध्यानीं यावें म्हणून! जी गोष्ट अनेक वर्षांपासून अस्तित्वांत आहे, तिचा नाश झालेला इंग्लंडला पाहवणार नाहीं. आपल्याकडील 'ज्ञानप्रकाश' शंभर वर्षें टिकून शेवटीं बंद पडलें! तो प्रकार इथें घडला नसता. कोणातरी संचालकानें तें चालवावयास घेतलें असतें–त्याचें रूप पालटलें असतें,








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

धोरण बदललें असतें, हें कबूल; पण "ज्ञानप्रकाश, वर्ष ११० " असें प्रसिद्ध करण्यांत त्याला खास अभिमान वाटला असता. डिकन्स्च्या कादंबरींत ज्या गुत्यांचीं वर्णनें आढळतात, ते एलिझाबेथकालीन गुत्ते अजूनहि त्याच इमारतींत आहेत, व फर्निचरहि मोठ्या काळजीपूर्वक जतन करून ठेवलेलें आहे. आणि या 'पत्र' मध्यें मध्यवर्ती लंडनपासून हा गुत्ता ७ मैल लांब असला तरी गर्दी असते. इंग्लंडमधील कोणत्याहि प्रश्नाचा विचार करतांना या गोष्टीचा विसर कधींहि न झाला पाहिजे.

या मानशालांचा आरंभ, इंग्लंडच्या कुठल्याहि गोष्टीप्रमाणें, अगदीं सामान्य आहे. धर्मोपदेशकांच्या देखरेखीखालीं या शाळा असत; गरीब मुलं या शाळेंत येत. कांहीं शाळांचे मुख्याध्यापक, अध्यापक, पगारास जोड म्हणून, पैसे घेऊन विद्यार्थी आपल्या घरीं ठेवीत. हल्लीं या मानशाला बहुतेक सगळयाच (दोन-तीन, मर्चण्ट टेलर्स्, सेंटपॉल्स-सारखे अपवाद सोडल्यास) वसतिगृहांच्या आहेत. मर्चण्ट टेलर्स्मध्येंहि वसतिगृहांत राहणारे ३० विद्यार्थी आहेतच. मुलांच्या मानशाला स्वतंत्र व मुलींसाठीं स्वतंत्र. मानशालेंत सहशिक्षणास कडक मज्जाव आहे.

## फ्लेमिंग कमिटीचें शिफारसपत्र

मानशाला कोणत्या शाळेस संबोधावें असा प्रश्न केला तर कांटेकोर उत्तर देतां यायचें नाहीं. १९४२ सालीं या शालांचा विचार करण्यासाठीं सरकारनें एक कमिटी लॉर्ड फ्लेमिंगच्या नेतृत्वाखालीं नेमली होती (कमिटीचा रिपोर्ट १९४४ सालीं प्रसिद्ध झाला). सरकारनें 'पब्लिक स्कूल' असें न म्हणतां, "हेडमास्तरांच्या किंवा व्यवस्थापकांच्या संघटनेशीं संलग्न सभासदत्व पावलेल्या शाळा" असा त्यांचा उल्लेख केला आहे. १८६९ सालीं, अप्पिंगहॅम् येथील एडवर्ड थ्रिंग नांवाच्या हेड्मास्तरनें, "हेड्मास्टर्स् कॉन्फरन्स्" स्थापन केली. १८६९ सालीं, 'दि एन्डाऊड स्कूल्स् ॲक्ट' पास झाला व ज्या शाळांची मालमत्ता, मिळकत ठराविक रकमेपेक्षां कमी आहे त्या यापुढें खाजगी रीत्या चालवूं नयेत अशा अर्थाचें एक कलम त्या कायद्यांत होतें. थ्रिंगची अप्पिंगहॅमूची पब्लिक शाळा त्या कायद्याखालीं येऊं शकत होती असें सरकारचें म्हणणें; व त्याला विरोध करण्यासाठीं थ्रिंगनें 'कॉन्फरन्स्' स्थापन केली, ती आजतागायत आहे!

पुढल्याच वर्षी प्राथमिक शाळांची संघटना सुरू झाली, व तीहि आज भव्य प्रमाणांत 'N.U.T. – नॅशनल युनियन ऑफ् टीचर्स' या नांवानें अत्यंत बलाढ्य म्हणून प्रसिद्धीस पावली आहे. प्रत्यक्षांत, 'पब्लिक स्कूल-' चा अर्थ, सरकारचा हस्तक्षेप नसलेली दुय्यम शिक्षण देणारी वसतिगृह असलेली, खर्चाची पण 'उत्तम' शिक्षण देणारी शाळा, असा केला जातो. आज इंग्लंडमध्यें संपूर्ण स्वतंत्र अशा ८९ शाळा आहेत; व ९९ शाळा सरकारकडून वा स्थानिक बोर्डांकडून अंशतः मदत घेणाऱ्या आहेत. या शाळांतून मुलांची संख्या २९००० आहे व मुलींची १०५०० आहे. प्रतिवर्षी, मुलंमुली मिळून ९००० जागा भरल्या जातात. या शाळा प्राथमिक शिक्षण देणाऱ्या नव्हेत हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. ११ + व्या वर्षी या शाळेंत घेतलें जातें. कांहीं मानशाला १३ + व्या वर्षी घेतात. या शाळेंत ५ ते ७ वर्षांपर्यंत शिक्षण दिलें जातें. या शाळेंतील विद्यार्थी पुढें विश्वविद्यालयांत उच्च शिक्षण घ्यायला जातात. ११ ते १३ वर्षे असणाऱ्या मुलांची संख्या या देशांत प्रतिवर्षी साधारणतः पांच लाख असते. त्यांपैकीं दरवर्षी ९००० फक्त मानशालात जाऊं शकतात (व एकाच वेळीं मानशालांतून अदमासें ५०,००० च्या आसपास विद्यार्थी असतात). पण या संख्येच्या चौपट-पांचपट विद्यार्थ्यांचे अर्ज, मानशालांतून प्रवेश मिळावा म्हणून, मुख्याध्यापकांच्या दप्तरीं असतात.

फ्लेमिंग कमिटीनेंहि या शाळांना शिफारसपत्र दिलें आहे, कीं या शाळा राष्ट्रास भूषणभूत होत. पण, फ्लेमिंग कमिटीनें शिफारसपत्र द्यावें यांत नवल नाहीं. कारण त्या कमिटींतल्या बहुसंख्य सभासदांचीं शिक्षणें मानशालांतूनच झालेलीं होतीं. बाल्डविन् मुख्य प्रधान असतां, हॅरो येथें समारंभानिमित्त गेले होते. त्या प्रसंगीं भाषण करतांना त्यांनीं उद्गार काढले: "When the call came to me to form a government, one of my first thoughts was that it should be a government of which Harrow should not be ashamed. I remembered how in previous governments there had been 4, perhaps 5









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

Harrovians; and I determined to have 6. " बाल्डविन्‌च्या उद्गारांत केवळ बढाई भरलेली असं मात्र म्हणतां येणार नाहीं. या मानशाला, देशांतील शेंकडा ७६ टक्के बिशप, डीन्स्, न्यायाधीश, पूर्वींचे आय्. सी. एस्, मॅजिस्ट्रेट, सनदी नोकर, मंत्री, गव्हर्नर, वसाहतींतील गव्हर्नर, बँकांचे व्यवस्थापक, रेल्वेचे अमलदार इत्यादि पुरवीत असतात; आणि यांपकीं शेंकडा ४७·५ तर विशेष प्रसिद्ध अशा बारा मानशालाच पुरवीत असतात!

मानशालांचा भूतकाळ इतका उज्ज्वल असतांना, त्यांचें वर्तमान वैभवाच्या दिमाखांत असतांना, त्यांच्या भवितव्याबद्दल चिंता निर्माण होत आहे याचं कारण काय? याचं कारण असं कीं, मानशालांची मिरासदारी बंद करून त्यांना देशाची जी शिक्षणव्यवस्था आहे त्या चौकटींत बसवावें अशी घोषणा अनेकांकडून होत आहे. १९४४ च्या शैक्षणिक कायद्याचें केवळ ध्येय नव्हे तर उद्देश असा कीं सर्वांना शिक्षणाची समान संधि मिळावी; त्यासाठीं १५ वर्षांपर्यंत वयाच्या मुलांना शिक्षण फुकट केलें, व पुढील तीन वर्षें, म्हणजे वयाच्या अठराव्या वर्षापर्यंत, आठवड्यांतून एक दिवस शिकलेंच पाहिजे अशीहि सक्ती केली. ज्यांना १५ व्या वर्षांच्या पुढें शिक्षण घ्यावयाचें आहे, ते १६ व्या वर्षी G. C. E. ( जनरल सर्टिफिकेट ऑफ् एज्युकेशन )—च्या कनिष्ठ परीक्षेस बसतात; नंतर १८ व्या वर्षी उच्च परीक्षेस बसतात; समाधानकारक गुण मिळाल्यास, सरकारी शिष्यवृत्ति मिळून, विश्वविद्यालयांत जातात. जेवढं शिक्षण घ्यायचं आहे तें शिष्यवृत्तीच्या बळावर घेतां येतें, कारण शिष्यवृत्ति भरपूर मिळते. शिष्यवृत्ति देतांना, पालकाची सांपत्तिक स्थिति लक्षांत घ्यावी असा दंडक आहे. आणि सांपत्तिक स्थितीप्रमाणें शिष्यवृत्तीची रक्कम सरकार ठरवितें. पण बहुतेकांना १२५ पौंडाच्या पुढेंच रक्कम प्रतिवर्षी मिळते, हजारोंना २२५ पौंड सालीना मिळते. याचा अर्थ ब्रिटनमध्यें उच्च शिक्षण सुद्धां फुकट आहे. ज्यांना शिष्यवृत्ति मिळत नाहीं ते उच्च शिक्षण अर्थातच घेऊं शकत नाहींत. आणि शें. ७० टक्के पालक आपल्या मुलांना ' मॉडर्न् ' स्कूलमध्यें पाठवीत असल्यामुळें, इतके विद्यार्थी उच्च शिक्षण घेण्यास जात नाहींत असाच त्याचा अर्थ होतो.

### मानशालेचे सांगितले जाणारे फायदे

मानशाला सरकारच्या नियंत्रणाखालीं नाहींत. त्या शाला हवी तेवढी फी विद्यार्थ्यांकडून घेऊं शकतात. मर्चण्ट टेलर्स्‌चे मुख्याध्यापक मला म्हणाले : " यांत लोकशाहीच्या विरुद्ध कसें वर्तन होतें ? उलट पक्षीं, ब्रिटिश जनता स्वातंत्र्याची, व्यक्तिस्वातंत्र्याची भोक्ती असल्यामुळें, आपल्या मुलाला सरकारी शाळेंत पाठवायचें कीं खाजगी शाळेंत, हा ठरविण्याचा अधिकार पालकानें आपल्याकडे ठेवला आहे." मानशालेचे मुख्याध्यापक तरफदारी करतील यांत नवल नाहीं. या मानशालांचा अभ्यासक्रम, सरकारी ग्रामरस्कूल्स्‌प्रमाणेंच असतो. परंतु सरकारी ग्रामरस्कूलमध्यें पाठविण्याऐवजीं, मानशालेंत आपल्या मुलानें जावें अशी धडपड पालकाची चाललेली असते, याला कारण काय? याचें कारण, सामाजिक प्रतिष्ठा. पब्लिक स्कूलमधून बाहेर पडलेल्या विद्यार्थ्यास जीवनांतील अनेक मार्ग व्यवस्थितपणें आणि प्रतिष्ठितपणें चोखाळतां येतात. मानशालेचे फायदे सांगतांना, असे सांगितले जातात : मुख्याध्यापकास स्वातंत्र्य असतें; शैक्षणिक प्रयोग करण्यास संधि व सोयी असतात. अध्ययनास वातावरण अनुकूल असतें. अध्यापकवर्ग उत्कृष्ट असतो. वैयक्तिक लक्ष्य पुरविलें जातें; एका अध्यापकाच्या हाताखालीं चारापासून पंधरावीस शिकस्त, इतकींच मुलें असतात; आठवड्याचे १६८ तास, मुलांवर देखरेख असते व वर्षांतून ३६ आठवडे अशी देखरेख असते. सांघिक वृत्तीचें पोषण होतें. ' प्रीफेक्ट ' पद्धत व ' हाऊस ' पद्धत या महत्त्वाच्या होत. शिस्त कडक असते. विस्तीर्ण क्रीडांगणें असतात, आणि खेळांना महत्त्व दिलें जातें; स्वावलंबनाच्या वृत्तीस पोषक, ती वृत्ति वृद्धिंगत करणारें शिक्षण मिळतें. आळस झडला जातो, पुढारीपणाचें शिक्षण दिलें जातें. पुढाकार घेऊन काम कसें तडीस न्यावें, याचें शिक्षण मिळतें. धैर्य, साहस, शौर्य, महत्त्वाकांक्षा, शिस्त इत्यादि गुण वाढीस लागतात, आणि महत्त्वाची गोष्ट म्हणजे चर्च हें शाळेंत असलेंच पाहिजे. धार्मिक भावनांचें पोषण झालेंच पाहिजे. जगांत खिश्चन धर्म हाच श्रेष्ठ, मानवाला तारणारा, याचें पक्कें रोपण मुलांच्या मनावर केलें जातें.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## बदललेलीं मूल्यें

वरवर पाहतां, मानशालेंतून मिळणारे फायदे डोळे दिपवून टाकणारे आहेत. परंतु, मानशाला भर-भराटीस ज्या थोर मुख्याध्यापकांनीं आणल्या, ( श्रूजबरीचे बट्लर, रुग्बीचे अर्नोल्ड–प्रसिद्ध अर्नोल्डकवीचे वडील ) त्यांच्यापुढें वैचारिक दृष्ट्या पावलें पडलीं आहेत असं म्हणतां येणार नाहीं. श्रूजबरी–येथील शाळेचीं सूत्रें बट्लर्नीं १७९८ त स्वीकारलीं, तेव्हां शाळेंत फक्त दोन मुलें होतीं ! आणि अर्नोल्ड जेव्हां रुग्बीचे हेडमास्तर १८२८ त झाले तत्पूर्वी ती शाळा अशीच डबघाईस आली होती. बट्लर् आणि अर्नोल्ड यांनीं पब्लिक शाळेंत क्रांति केली. अर्नोल्डनें '' ख्रिश्चन जंटलमन '' ही घोषणा पुढें ठेऊन कार्य केलें. आज त्या '' ख्रिश्चन जंटलमन '' घोषणेस अर्थ राहिलेला नाहीं. ब्रिटिश साम्राज्याची त्या वेळीं वाढ होत होती आणि ' राज्य करण्यास लायक ' असे वीर राष्ट्राला हवे होते. ते 'वीर–पुरुष ' निर्माण व्हायचे असतील तर कोणत्या गुणांचा प्रादुर्भाव व्हावयास हवा हें त्या काळच्या लोकांनीं जाणलें होतें. पण विसाव्या शतकांत तींच मूल्यें कशीं टिकून राहणार ? उदाहरणार्थ, धाडस, शौर्य, शिस्त, सांघिक वृत्ति हे गुण कीं अवगुण ? कारण, लुटारूंच्या टोळींतील प्रत्येकांत हे गुण अवश्य हवेतच; त्यांखेरीज दरवडेखोरी यशस्वी कशी होईल ? चारित्र्य-संपादनास निराळेच गुण हवे असतात, ते गुण या मानशालांतून वाढीस लागत नाहींत अशी एक महत्त्वाची आणि रास्त टीका या शालांवर केली जात आहे. टीकाकारांत दोन भाग आहेत. एक वर्ग अशी टीका करतो कीं, 'या शालांतून मिळणारें शिक्षण फार चांगलें आहे; पण तें फार महाग आहे व त्यामुळें या शाळा केवळ श्रीमंतांच्या मुलांसाठींच होत; व लोकशाहीचा हा खून आहे ! एक तर या शाळातली फी काढून टाकून त्या सर्व मुलांना मोकळ्या कराव्यात किंवा सरकारनें असल्या शाळा अनेक काढाव्यात. या शाळांचें अस्तित्व वर्गभेद नागड्या स्वरूपात दाखवितो; गरीब मुलें हुशार असूनहि या शाळांत जाऊं शकत नाहींत ' – फ्लेमिंग कमिटीनें दोन पर्याय यावर सुचविले होते : ' स्कीम ए ' आणि ' स्कीम बी ' या नांवानें ते ओळखले जातात. १९२६ सालीं कांहीं मानशाला सरकारकडून मदत घेऊं लागल्या होत्या ( त्यांना 'डायरेक्ट ग्रॅन्ट स्कूल्स् ' म्हणत ). त्या शाळांनीं फी एक तर बंदच करावी किंवा पालकांच्या सांपत्तिक स्थितीप्रमाणें फी आकारावी. दुसऱ्या स्कीमनें सुचविलें कीं संपूर्ण स्वतंत्र शाळांनीं २५ टक्के विद्यार्थी सरकारतर्फे आणि स्थानिक बोर्डा-तर्फे आलेले स्वीकारावेत. या २५ टक्के विद्यार्थ्यांचा खर्च सरकार वा स्थानिक बोर्ड पुरवील. यांची निवड त्यांची बुद्धिमत्ता व मिळणाऱ्या शिक्षणानें सदरहू मुलाचा फायदा होणार आहे किंवा नाहीं हें लक्षांत घेऊन केली जाईल. ( श्रीमंतांच्या मुलांचे बाबतींत मात्र हा प्रश्नच उद्भवत नाहीं, हें विशेष ! – चर्चिलसाहेब शाळेंत असतांना किती ' तीव्र ' होते हें सांगायला नकोच ! आणि म्हणूनच विश्वविद्यालयांतील शिक्षणहि ते घेऊ शकले नाहींत ! – ) ' स्कीम ए ' थोड्या प्रमाणांत चालू आहे; पण ' स्कीम बी ' मात्र मृत आहे; कारण विद्यार्थीच मिळणें अवघड आहे ! याचीं कारणें सामाजिक असल्यानें, त्यांचा ऊहापोह या मर्यादित लेखांत करतां येत नाहीं. या चर्चेवरून हें लक्षांत येईल, कीं मानशालांचें वर्चस्व सरकारसुद्धां मान्य् करीत आहे व त्या शाला जिवंत राहाव्यात यासाठीं सरकारचे पण प्रयत्न सुरू आहेत.

टीकाकारांचा दुसरा वर्ग अधिक महत्त्वाचा आहे. या वर्गांत बर्ट्रॅन्ड रसेल सारखे थोर चिंतक–तत्त्वज्ञ येतात. त्यांचें म्हणणें असें कीं या शालांतून जें शिक्षण दिलें जातें तें म्हणजे हुकूमशाहीस पोषक, औद्धत्यपूर्ण, अरेरावी गाजविणारें, पोकळ डामडौलाचें, समाजापासून फारकत करणारें, सामाजिक सहानुभूति हरपून टाकणारें असें असतें. आपल्या '' एज्युकेशन ॲन्ड गुड् लाईफ् '' या ग्रंथांत ( पृ. ५४ ) रसेल लिहितात : " The battle of Waterloo may have been won on the play-field of Eton, but the British Empire is being lost there." हिंदुस्थान स्वतंत्र होण्यापूर्वी कितीतरी वर्षें हें पुस्तक लिहिलें गेलें होतें, तेव्हां रसेलची भविष्यवाणी किती तंतोतंत खरी ठरली, हें स्पष्ट होतें ! रसेलच्या मतें शिक्षण हें Accordind to 3 A's ( Age, Ability, Aptitude) असावें पण चारित्र्यवर्धन According to 3 S's (Sensitivity, Sincerity, Sympathy,) व्हावें, व यांचा अभाव मानशालांतून दिसून येतो.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रसेलसाहेबांची टीका 'मूले कुठारः' असल्यामुळें विचारवंतांचें लक्ष्य तिकडे वेधलें गेलें आहे व आपल्या ध्रुवस्थानापासून आपण निखळण्याची शक्यता निर्माण होत चालली आहे हें मानशालेच्या संचालकांपैकीं जे जागरूक आहेत, त्यांना कळून चुकलें आहे. आणि भविष्यांत आपण शिल्लक राहायचें असल्यास कोणत्या दिशेनें पावलें टाकलीं पाहिजेत, या दृष्टीनें चर्चाहि सुरू आहे.

### मानशालांचें भवितव्य

मानशालांनीं आहे हीच स्थिति कायम ठेवण्याचा आग्रह धरला, तर कालांतरानें त्या नामशेष ( पंचवीस तीस वर्षांच्या आंत ) होतील असें पुष्कळ शिक्षणतज्ज्ञांचें मत आहे. याचें प्रमुख कारण म्हणजे हत्ती पोसावा तसा यांचा खर्च ! मानशालेंत अभ्यासक्रम वरच्या दर्जाचा असतो. व लॅटिन ग्रीक, ( यांपैकीं एक लॅटिन तर आवश्यक असतेच; कांहीं ठिकाणीं ग्रीकहि ), जर्मन किंवा फ्रेंच यांपैकीं एक; आणि बाकीचे विषय, इतिहास-भूगोल, गणित, पदार्थविज्ञान, रसायन, इत्यादि आलेच ! मानशालेंत प्रवेश करण्यापूर्वी, त्या विषयांचें शिक्षण जेथें दिलें जातें अशा, पूर्वतयारी करून घेणाऱ्या ( Preparatory ) प्राथमिक शाळांत, मुलांना वयाचीं ७ ते १३ वर्षांपर्यंत पाठवावें लागतें. या 'प्रेप्' शाळांचा खर्चहि जबरदस्त असतो; कारण यासुद्धां 'स्वतंत्र' नि 'खाजगी' च असतात; त्यांना जबरदस्त फी आकारावी लागते ! या 'प्रेप्' शाला 'डे' स्कूल्स् असतात, म्हणून यांचा खर्च दरमुलाचा सालिना १५० पौंडाच्या आसपास येतो. तेव्हां, एका मुलास मानशालेंत पाठवावयाचें असलें, तर ९०० पौंड "प्रेप्" चा खर्च, आणि १५०० पौंड "मानशाले-" चा खर्च-एकूण २४०० पौंड म्हणजे बत्तीस हजार रुपये होतात ! व हे पैसे टॅक्स-फ्री, म्हणजे इतके पैसे भरायला याच्या दीडपटीनें अगोदर मिळवायला हवेत. याचा अर्थ असा कीं एका मुलासाठीं पालकानें ३६०० पौंड मिळवायला हवेत ! - ब्रिटन हें "कल्याणकारी" राष्ट्र असलें तरी प्रत्येक नागरिकच नव्हे पण बहुसंख्य नागरिक इतके श्रीमंत खास नाहींत; त्यामुळें पूर्वीप्रमाणें, या शाळेंत पाठविण्याची ओढ राहिलेली नाहीं. पूर्वीप्रमाणें, मानशालांतून बाहेर पडणाऱ्या मुलांचा भावहि आतां उतरत चालला आहे. या मानशाला संपूर्ण स्वतंत्र ( केवळ फी आणि देणग्या, सरकारची मदत न घेतां, यापुढें फार वर्षे टिकूं शकणार नाहींत हें निश्चितच; आणि सरकारनें सरसकट सगळ्या मानशालांना ( त्यांना जिवंत ठेवायचें असल्यास, -आणि ब्रिटनची ऐतिहासिक परंपरा लक्ष्यांत घेतां, त्या कोणत्या तरी रूपांत जिवंत राहतीलच -) मदत करायचें ठरविल्यास, सरकारचा हस्तक्षेप होणारच. व मग त्या शालांत पुष्कळ फरक होईल हेंहि निश्चित. पण नवल असें आहे कीं या शाळा "Two Nation Theory" अस्तित्वांत आणतात व ती टिकवून धरतात. म्हणून लोकशाही विचारसरणीला त्या विरोधी आहेत.

---

## दुपार जळते —!

दुपार जळते —

निर्जल पाउलवाट भुईला
वेढित दूरच पळते

कृष्ण सावल्या —
तरुतळिं निश्चल अंग चोरुनी
मूकपणें पडलेल्या

फिरे उसासत —
अर्ध्या सुकल्या माळावरुनी
मधेंच वेडा वात

दुपार जळते —

कुशिंत ढगांच्या श्रांत निळें नभ
जळत विसांवा घेतें

— वि. ज. बोरकर




अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. दे. द. वाडेकर

# जीवन आणि तत्त्वज्ञानी दृष्टि

सुसंस्कृत किंवा ज्ञानी मनुष्याचें जीवन कसें असतें, असें जर विचारलें तर सामान्यतः त्याचें उत्तर असें दिलं जातें कीं **जीवनांत कांहीं तत्त्वज्ञानी दृष्टि** (Philosophic Outlook) असणें हें सुसंस्कृत किंवा ज्ञानी जीवनाचें लक्षण होय. किंबहुना, जीवनाचा मार्ग आक्रमीत असतांना त्याकरितां उत्कृष्ट आणि अत्यंत मोलाचें असें जर कोणतें पाथेय आवश्यक असेल तर तें तत्त्वज्ञानी दृष्टि किंवा वृत्ति होय. म्हणून ज्याला आपलें जीवन सार्थकीं लावावयाचें असेल, त्यानें आपल्या जीवनांत तत्त्वज्ञानी दृष्टि संपादन करून ती आत्मसात् करणें अत्यन्त अगत्याचें ठरतें. ही 'तत्त्वज्ञानी दृष्टि' म्हणजे काय, या शब्दांतून कोणता आशय अभिप्रेत आहे, याचें थोडक्यांत स्पष्टीकरण करण्याचें प्रस्तुत लेखांत योजिलें आहे.

## 'तत्त्वज्ञाना'चा आशय

**तत्त्वज्ञान – 'फिलॉसफी'** – या शब्दाचा अर्थ व आशय कसा उत्क्रान्त होत गेला याचा विचार करूं लागलें, तर कधीं या अर्थावर भर तर कधीं दुसऱ्यावर, अशा अनेक स्थित्यंतरांतून तो शब्द गेलेला दिसून येतो. इंग्रजींतील 'फिलॉसफी' या शब्दाला पायथॅगोरस व सॉक्रेटिस यांच्या काळीं 'ज्ञानाची आवड' असा त्याचा मूळ यौगिक अर्थ रूढ होता. प्लेटो व ॲरिस्टॉटलच्या काळीं त्या शब्दाला 'विश्वाविषयींची तर्कशुद्ध उपपत्ति' असा अर्थ आला, तर स्टॉइक्स व एपिक्युरिअन्स यांच्या काळीं "जीवनाची एक विशिष्ट सरणी किंवा कला" असा 'फिलॉसफी' शब्दाचा आशय समजला गेला. मध्ययुगांत तत्त्वज्ञान किंवा 'फिलॉसफी' हें धर्माचा एक पाठीराखा मित्र म्हणून मानलें गेलें व प्रेषितांना ज्या दैवी धर्माज्ञा अंतःस्फूर्तीनें स्फुरल्या त्या धर्माज्ञांची बुद्धिवादी मांडणी व मंडण करणें हें काम तत्त्वज्ञानाकडे आलें. प्रेषितांना झालेल्या दैवी साक्षात्काराच्या आधारें धर्मानें आपले मानव, विश्व व ईश्वर यांच्या संबंधींचे कांहीं सिद्धान्त बसविले होते. तेच सिद्धान्त त्यावेळच्या तत्त्वज्ञानानें स्वीकारले. पण फरक होता तो दोहोंच्या पद्धतींत होता. धर्मानें मान्य केलेले सिद्धान्तच निराळ्या विशिष्ट पद्धतीनें, बुद्धिवादाच्या आधारें, तार्किक पद्धतीनें मांडून दाखवून त्यांचें समर्थन करणें ही कामगिरी तत्त्वज्ञानाकडे सोंपविण्यांत आली. तत्त्वज्ञान व धर्म यांमध्यें मध्ययुगीन काळीं केवळ पद्धतींमध्यें फरक होता. पण पुढें पुढें हा फरक पद्धतीपुरताच मर्यादित न रहातां, व्यापक होत जाऊन आधुनिक काळीं तर तो फरक परस्परांच्या सिद्धान्तांतहि पडला. या प्रक्रियेंत तत्त्वज्ञानाच्या स्वरूपांतहि पालट झाला. तत्त्वज्ञान म्हणजे एक स्वायत्त, स्वतंत्र विचारानें प्रेरित झालेली, बुद्धिनिष्ठ समीक्षा किंवा विश्व आणि मानवी जीवन यांची समर्पक उपपत्ति लावून दाखविणारी एक रचना किंवा दर्शन असें त्याला स्वरूप आलें. तत्त्वज्ञानाचें असें अर्थान्तर होण्याच्या प्रक्रियेस सुरुवात, स्थूलमानानें सांगायचें झाल्यास, बेकन व देकार्त यांच्या वेळेपासून झाली. व त्या अर्थाची ठसठशीत व परिणत अभिव्यक्ति, अलीकडच्या काळांत, स्पेन्सरच्या तत्त्वज्ञानविषयक कल्पनेंत दिसून आली. तत्त्वज्ञान म्हणजे ज्ञानाचा संपूर्ण समन्वय अशी स्पेन्सरची तत्त्वज्ञानाविषयीं कल्पना असून, ती कल्पना त्यानें आपल्या 'समन्वयात्मक तत्त्वज्ञाना'-(Synthetic Philosophy) च्या रूपानें मांडून दाखविण्याचा प्रयत्न केला. ज्यांतून बुद्धि-

---

अमळनेरचे श्रीमंत प्रतापशेट यांच्या पंचाहत्तराव्या वाढदिवसाच्या निमित्तानें अमळनेर येथें २३ डिसेंबर रोजीं साजरा झालेल्या 'श्रीमंत प्रतापशेटजी अमृतोत्सवसमारंभां'त श्रीमंत प्रतापशेटजी यांना एक 'गौरवग्रंथ' समर्पण करण्यांत आला. त्या गौरवग्रंथांतील प्रस्तुत लेखकाच्या 'Philosophical Outlook in Life' या मूळ इंग्रजी लेखाचा हा मुक्त अनुवाद आहे. हा अनुवाद प्रसिद्ध करण्याची 'श्रीमंत प्रतापशेट अमृतोत्सव समिती'नें परवानगी दिली याबद्दल तिचे मनःपूर्वक आभार. – का. सं.







अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

निष्ठ भूमिकेवरून विश्व आणि त्यांतील मानवाचें स्थान यांविषयीं एक सुसंगत उपपत्ति निष्पन्न होऊं शकते असा सर्व ज्ञानाचा विचारात्मक समन्वय म्हणजे तत्त्वज्ञान असा तत्त्वज्ञानाचा अर्थ रूढ होऊं लागला.— तत्त्वज्ञानासंबंधींची ही कल्पना प्रातिनिधिक व आधुनिक विचाराशीं सुसंगत म्हणून प्रस्तुत विवेचनाकरितां गृहीत धरून चालावयास हरकत नाहीं.

तत्त्वज्ञानी दृष्टि किंवा वृत्ति यांमधील ' तत्त्वज्ञान ' शब्दाचा आशय स्थूलपणें निश्चित केला. 'दृष्टि' किंवा 'वृत्ति' या दुसऱ्या शब्दाचाहि अर्थ प्रस्तुत लेखांतील विवेचनाच्या दृष्टीनें निश्चित होणें आवश्यक आहे. आपल्या जीवनांतील सर्व व्यापारांच्या बुडाशीं, किंबहुना जीवनांतील सर्व व्यापारांवर आपला 'रंग' उमटविणाऱ्या आपल्या कांहीं श्रद्धा व मनाचे कल असतात. स्थूल मानानें म्हणावयाचें झाल्यास, अशा श्रद्धा व मानसिक कल यांचा संमिश्र संघात (Complex) म्हणजे आपली ' वृत्ति ' किंवा ' दृष्टि ' होय. जीवनाचे सर्व व्यापार हें या दृष्टीचें बाह्य रूप होत. जीवनाचें अव्यक्त अधिष्ठान व गृहीत आधार म्हणजे ही ' दृष्टि 'च होय; जीवन हें या दृष्टीचें व्यक्त स्वरूप व आविष्कार होय. अव्यक्त ' दृष्टि ' व व्यक्त जीवनव्यापार ह्या ( व्यक्तीच्या ) एकाच व्यक्तित्वाच्या दोन उलट–सुलट बाजू होत. व्यक्तीची 'दृष्टि' ही त्या व्यक्तीची अप्रकट शक्ति आणि व्यक्तीचें जीवन हा त्या शक्तीचा प्रकट होणारा आविष्कार.

## ' तत्त्वज्ञानी दृष्टि ' किंवा वृत्ति म्हणजे काय ?

जीवनांत **तत्त्वज्ञानी दृष्टि किंवा वृत्ति** असणें याचा मग अर्थ असा कीं विश्वाचें स्वरूप व विश्वांतील आपलें स्थान यांविषयीं माणसानें जो सर्वांगीण समन्वयात्मक विचार केला असेल त्यांतून उदित झालेल्या ज्या स्थिर श्रद्धा आणि कल त्या सर्वांचा समुच्चय किंवा संघात. तत्त्वज्ञानी दृष्टि म्हणजे आपल्या जीवनाची उभारणी विश्वाच्या ज्ञानाच्या आधारावर करण्याचा, जीवन सुसंस्कृतपणें जगण्याचा, जीवनांत ज्ञानाधिष्ठित कर्मयोग आचरण्याचा संतत अविरत प्रयत्न होय. ज्या माणसाला ज्ञान-चिंतन-मनना-अंतीं विश्वाची एखादी सयुक्तिक उपपत्ति गवसून, विश्वांतील आपलें स्थान काय याचें ज्ञान झालें आहे व त्या ज्ञानानुसार जो आपल्या जीवनव्यवहारांत वागण्याचा सतत प्रयत्न करीत रहातो, अशा माणसालाच त्यानें तत्त्वज्ञानी दृष्टि किंवा वृत्ति अंगीं बाणवली आहे असें म्हणतां येईल.

तत्त्वज्ञानी वृत्ति या शब्दसंहतीचा हा विशिष्ट अर्थ विचारांत घेतांना तत्त्वज्ञानी वृत्ति म्हणजे अमुक एकाद्या मताप्रमाणेंच विश्वाची ठराविक उपपत्ति स्वीकारणें नव्हे, हें मात्र लक्षांत ठेवलें पाहिजे. पुष्कळ वेळां तत्त्वज्ञानी दृष्टि परलोकवादाशीं, संन्यासवादाशीं, गूढवादाशीं वा ईश्वरवादाशीं एकरूप समजली जाते व हे सर्व एक किंवा अनेक ' वाद ' म्हणजे तत्त्वज्ञानी दृष्टि अशी गल्लत केली जाते. तत्त्वज्ञानी दृष्टि म्हणजे परलोकवादीच असली पाहिजे असें मानण्याची आवश्यकता नाहीं. एकाद्या तत्त्वज्ञाची – ज्याला हें जग केवळ माया, भ्रम किंवा आभास आहे असें वाटतें अशा तत्त्वज्ञाची वृत्ति किंवा दृष्टि परलोकवादी असेलहि. पण त्यामुळें तत्त्वज्ञानी दृष्टि म्हणजे परलोकवादच नव्हे. हीच गोष्ट इतर वादांची. कांहीं तत्त्वज्ञान्यांची दृष्टि ज्याच्या त्याच्या विश्वदर्शनानुसार संन्यासवाद, गूढवाद किंवा ईश्वरवाद यांपैकीं एक किंवा अनेक वादांनीं प्रेरित असेलहि. पण तत्त्वज्ञानी दृष्टि म्हणजे अमका ' वाद'च असें मानण्याचें कारण नाहीं.

## जीवनमंदिराचीं चार प्रमुख अंगें

तत्त्वज्ञानी दृष्टीचा अर्थ आपण बघितला. पण यापेक्षांहि अधिक निश्चितपणें तत्त्वज्ञानी दृष्टीमध्यें कोणत्या गोष्टींचा अंतर्भाव होतो, तत्त्वज्ञानी वृत्तीची कल्पना स्पष्ट होण्याकरितां तिची अधिक रेखीव रूपरेषा कशी काढतां येईल, या प्रश्नांचा विचार करणें अवश्य आहे. प्रस्तुत लेखकाच्या मतें, जीवन हें एखाद्या मंदिराप्रमाणें आहे असें कल्पिलें तर त्या जीवनरूपी मंदिराचीं चार प्रमुख अंगें तत्त्वज्ञानी वृत्तींत उतरलीं पाहिजेत. जीवनरूपी देवालयाचीं चार प्रमुख अंगें अशीं : ( १ ) सत्ताशास्त्रीय ( Metaphysical ) विचार हा त्याचा पाया होय. ( २ ) मानसशास्त्रीय विचार त्याचें अधिष्ठान होय. (३) या जीवनरूपी देवालयाचें तोंड नीतिशास्त्राकडे असलें पाहिजे, जीवन नीतिशास्त्राभिमुख असलें पाहिजे. ( ४ ) धर्म हा जीवनदेवालयाचें शिखर होय–. ज्यानें आपलें जीवन सत्ताशास्त्राच्या व मानसशास्त्राच्या भक्कम आधारावर उभारून, तें नीतिप्रवण बनविलें आहे व धर्मांत परिणत केलें आहे, त्याच्याच अंगीं तत्त्वज्ञानी वृत्ति बिंबली असें म्हणतां येईल. ही तत्त्व-



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ज्ञानी वृत्ति जसजशी श्रद्धेच्या व निष्ठेच्या रूपानें अधिकाधिक सखोल होत जाऊन व्यक्तित्वांत मुरत जाईल व जसजशी ती प्रत्यक्ष जीवनव्यवहारांतून प्रकट होत जाईल, तसतशी ती ' तत्त्वज्ञानी ' या संज्ञेला खऱ्या अर्थानें पात्र होत जाईल. तत्त्वज्ञानी वृत्तीचे जे वर मुख्य चार भाग किंवा अंगें दिले आहेत त्यांचेंच संक्षिप्त विवरण करावयाचें योजिलें आहे.

### कांहीं सत्ताशास्त्रीय प्रश्न

जीवनाचें सत्ताशास्त्रीय अधिष्ठान कोठें सांपडतें ? विश्वाचें स्वरूप काय, विश्वांत मानवाचें स्थान काय यांबाबत व्यक्तीचीं जीं विचारपूर्वक बनविलेलीं मतें, बाळगलेल्या श्रद्धा व वृत्ति असतील, त्यांमध्यें जीवनाचें सत्ताशास्त्रीय किंवा आध्यात्मिक अधिष्ठान आढळून येतें. विश्वासंबंधीं जे मुख्य सत्ताशास्त्रीय प्रश्न उभे रहातात ते असेः विश्व हें केवळ जड परमाणूंचा, किंवा आधुनिक पदार्थविज्ञानशास्त्रानें परमाणूंना उडवून लावून त्यांच्या जागीं ज्या नैसर्गिक तेजःशक्ती प्रस्थापित केल्या आहेत त्या तेजःशक्तींचा, केवळ यांत्रिक आंधळा खेळ आहे काय ? कीं विश्व हें त्यामागील कोणा आध्यात्मिक शक्तीच्या हेतूचा आविष्कार आहे ? विश्व जें आपणांस दृग्गोचर होतें तें केवळ निर्जीव भौतिक–रासायनिक प्रक्रियांचा विलास आहे कीं त्यामागें कांहीं प्रेरक असें एखादें चैतन्यशाली तत्त्व वा चेतन आत्मे आहेत ? तसेंच मानवी आत्मा किंवा व्यक्तित्व हें तरी काय आहे ? कांहीं अंतर्गत शक्तींचा तो केवळ परिपाक आहे कीं त्या व्यक्तित्वांतच कांहीं उत्स्फूर्त, स्वतंत्र, कर्तृत्व आहे ? — हे सर्व प्रश्न अत्यंत मोठे असून प्रस्तुत स्थळीं त्यांचें यथातथ्य विवेचन करणें दूरापास्तच आहे. शिवाय, या प्रश्नांचीं भिन्न भिन्न काळच्या व भिन्न भिन्न मतांच्या अनेक तत्त्वज्ञांनीं भिन्न भिन्न उत्तरें देऊन ठेवलेलीं आहेत. तेव्हां त्यांत न शिरतां प्रस्तुत लेखकास या प्रश्नांबाबत जें काय ठाम वाटतें तें थोडक्यांत सांगण्याचें योजिलें आहे.

### उत्क्रान्तिशील अनेकात्म चैतन्यवाद

विश्वाच्या स्वरूपाविषयीं ज्या कांहीं सत्ताशास्त्रीय ( metaphysical ) उपपत्ती पुढें मांडल्या जातात त्यांत माझ्या दृष्टीनें जी कमींत कमी चूक व जास्तींत जास्ती सत्य असणें संभवनीय वाटते ती उपपत्ति म्हणजे ( teleological ) निश्चित श्रेयाच्या दिशेनें उत्क्रान्त होणारा, उत्क्रान्तिशील अनेकात्म असा चिद्वाद किंवा चैतन्यवाद ( spiritualism ) होय. शुष्क यांत्रिक जडवादाचा विचार करण्याची जरूरीच नाहीं. कारण गेल्या तीनचार शतकांत आधुनिक विज्ञानांतून जे निष्कर्ष निष्पन्न झाले आहेत त्या निष्कर्षांमुळें जडवाद विचारबाह्यच ठरतो. हें विश्व उत्क्रान्त होत आलें आहे. आणि ही उत्क्रान्तीची प्रक्रिया म्हणजे केवळ शुद्ध यादृच्छिक योगायोगांची किंवा अद्भुत चमत्कारांची अवचित जमून आलेली मालिका नव्हे ! केवळ अचेतन सृष्टीचें जरी अवलोकन केलं, तरी तीमध्यें देखील एक प्रकारचें योजनाबद्ध अस्तित्व आहे, ही स्थूल वस्तुस्थिति अर्थपूर्ण रीतीनें नजरेंत भरते. त्यामुळें अंध यांत्रिक जडवादाची उपपत्ति लंगडीच पडते. भौतिक सृष्टीमध्यें एक 'नियमबद्धता' आहे असें म्हटलें म्हणजें त्यामागें कांहीं ' योजना ' असली पाहिजे हें मानावेंच लागतें. सर जेम्स जीन्सला तर या असीम, आदिम (primitive ) अनादिप्राय, विराट्स्वरूपी खगोलपर्यंत विश्वामध्यें ' चैतन्याच्या पावलां'ची चाहूल लागली ! इतकें जरी आपण मानलें नाहीं तरी, जर विश्वाच्या उपपत्तीचे ' विश्वरचना नियमबद्ध तरी आहे ' किंवा 'अघटित चमत्कार तरी आहे ' असे दोन पर्याय असतील, तर ' अघटित चमत्कार' या कल्पनेला खो देणारी जी ' नियमबद्धता ' म्हणजेच योजनाबद्धता तिच्या मागें कांहीं योजकत्व, कांहीं हेतु असला पाहिजे हें कितीहि पुसट व गर्भित अर्थानें कां होईना मान्य करावेंच लागतें. विश्वाच्या उत्क्रान्तीच्या श्रेणींत, जड भूतसृष्टीपासून प्राणिसृष्टीकडे, प्राणिसृष्टीपासून बुद्धिमान् मानवाकडे, बुद्धिमंत मानवापासून समाजाकडे, असें जसजसें उंच उंच जावें तसतसें विश्वांतील हें नियम-बद्धतेचें लक्षण अधिकाधिक स्फुट व मूर्त स्वरूपांत दृग्गोचर होत जातें जीवन ही एक अस्फुट, अजाणती ( कदाचित् 'जाणीव' उत्पन्न होण्यापूर्वीची ) पण हेतुगर्भ अशी अनुरूपवर्तिनी प्रवृत्ति ( process of adjustment ) आहे; साध्यानुरूप साधनांची व साधनानुरूप साध्याची रचना ती सारखी करीत असते. जीव किंवा प्राणी हीं सृष्टीच्या त्या अनुरूपवर्तिनी प्रवृत्तीचीं साधनें, वाहनें, किंवा इन्द्रियें होत. उत्क्रान्तीच्या श्रेणींत, जीवसृष्टींत मन जेव्हां उत्क्रान्त झालें त्या पातळीवर, ही अनुरूपवर्तिनी









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रवृत्ति अधिकाधिक जाणिवेनें युक्त, बुद्धिपूर्वक व स्व-संवेदी (Self-conscious) बनत जाते. जसजशी स्वसंवेदनशीलता वाढत जाते, तसतशी ही अनुरूपवर्तिनी प्रवृत्ति अधिकाधिक प्रभावी होत जाते. तिच्या वाढत्या प्रभावामुळें, आतां-पर्यंत केवळ जिवंत रहाण्याच्या गरजेलाच जखडून राहिलेल्या प्राण्यांच्या शक्ती वाढत्या प्रमाणांत मुक्त होत जातात व विधायक आणि निर्माणानुकूल मार्गांनीं विक-सित होत रहातात. त्यांतूनच पुढें अधिकाधिक सामा-जिक जीवन विकसित होत जातें. आणि त्यांतून पुढें उच्चतर आणि स्वतःसिद्ध मूल्यें निर्माण होत जातात. याच मूल्यांची मानवी जीवनांतील परिणति 'सत्यं, शिवं सुन्दरम्' या त्रयींत झालेली दिसून येतें. त्याच पातळीवर, मनाच्या ठिकाणीं जे स्वसंवित्ति, ('purposefulness) हेतुपूर्वकता (–ही हेतुपूर्वकता म्हणजे खालच्या पातळीवरील जीवसृष्टींत दिसून येणारी हेतुगर्भता (purposiveness) नव्हे–), कर्तृत्व आणि स्वातंत्र्य (बंधनातीत होण्याची प्रवृत्ति) इत्यादि गुणविशेष दिसून येतात त्यांमुळें या विकसितावस्थेंतील मनाला 'आत्मा' म्हणणें उचित होईल. हाच 'आत्मा' किंवा 'आत्मे' पुढें उत्क्रा-न्तीच्या क्रमांत मूल्यांच्या शोधांत मार्गक्रमण करीत असतांना व्यक्तींच्याहि पलीकडे जाऊन व्यापक असे सहकार्याधिष्ठित पुरुषार्थ करून दाखवीत असतात. त्यांतूनच पुढें क्रमानें सामाजिक एकतेचे आदर्श निर्माण होत जातात. ही प्रगतीची प्रक्रिया चालूच आहे; जस-जशी ती प्रगत होत जाईल तसतसें या सामाजिक आदर्शाचें स्वरूप अधिकाधिक स्पष्ट होत जाईल. आतां आपणांस त्या प्रक्रियेचें जें विद्यमान स्वरूप दिसत आहे त्यावरून तिच्या भावी रूपाचें केवळ ओझरतेंच दर्शन होणें शक्य आहे.

### 'प्रेरक विश्वतत्त्व' ('Elan Universel')

विश्वाची जी ही सबंध उत्क्रान्तिशील प्रवृत्ति दिसून येते, तिचा अर्थ केवळ यदृच्छा, योगायोग, चमत्कार किंवा अंध यांत्रिक जडवाद यांवर आधारलेल्या उपपत्तींनीं लागूंच शकत नाहीं. विश्वाच्या अगदीं आरंभीं (–विराट् विश्वाला निश्चित आदि किंवा निश्चित अंत नाहीं. तें अनादि व अनंत आहे. तरी पण अंदाजानें बोलायचें तर विश्वाच्या आरंभीं) अगदीं पहिली आदिम मूळ अशी कांहीं प्रेरणा, चोदना असली पाहिजे असें मानणें भाग पडतें. उत्क्रान्तिशील प्राणिशास्त्राचा महान् प्रवर्तक फ्रेंच तत्त्वज्ञ बर्गसॉं यानें, जीवन प्रस्फुरित होण्याच्या मुळाशीं आरंभीं **प्रेरक प्राणतत्त्व** (elan vital) असावें, असें प्रतिपादन केलें आहे. अत्यंत कुशाग्र बुद्धीचा प्रसिद्ध ब्रिटिश मानसशास्त्रज्ञ मॅक्डुगल यानेंहि अशाच प्रकारें, उत्क्रान्ती-च्या क्रमांत जेव्हां मन प्रस्फुरित झालें त्याच्या मुळाशीं Horme नांवाचें प्रेरणातत्त्व असावें, असें मानलें. यालाच आपण '**प्रेरक मनस्-तत्त्व**' (elan psychique) म्हणूं या. म्हणजे विश्वाच्या आरंभीचें तत्त्व किंवा चोदना हो कल्पना इतकी व्यापक बनविली पाहिजे कीं तिच्यांत उत्क्रान्तीच्या इतिहासांतील जीवसृष्टिपूर्व आणि मनोविकासोत्तर अशा दोन्हींहि कालखंडांचा त्यांत समावेश व्हावा. वरील दोन तत्त्व-ज्ञांनीं मांडलेल्या उपपत्तींच्या निष्कर्षांचे सूत्र धरून विश्वाच्या उत्क्रान्तीचें मूळ शोधीत शोधीत गेल्यास, तें शेवटीं मूळ '**प्रेरक विश्वतत्त्व**' (elan universel) अशासारखें असावें, असें म्हणणें भाग पडतें. ह्या '**प्रेरक विश्वतत्त्वा**'नें उत्क्रान्तीच्या पुढील निरनिराळ्या टप्प्यांत निरनिराळीं स्वरूपें व नांवें धारण केलीं असावीत. उत्क्रान्तीच्या क्रमांत जीवसृष्टिपूर्व जड-सृष्टीच्या मुळाशीं '**प्रेरक भौतिकतत्त्व**' (elan material) असलें पाहिजे. तेंच पुढें क्रमानें '**प्रेरक प्राणतत्त्व**' (बर्गसॉंचें) व '**प्रेरक मानसतत्त्व**' (मॅक्डु-गलचें) असें परिणत होऊन विश्वाच्या उत्क्रान्तींतील जीवप्रधान व मनःप्रधान कालखंडांचा उदय झाला असावा. यानंतरहि पुढचा टप्पा म्हणजे सामाजिक उत्क्रान्तीचा, ज्याच्या मुळाशीं '**प्रेरक सामाजिक तत्त्व**' elan social) मानतां येईल. त्याचा अर्थ असा कीं विश्व हें शेवटीं '**प्रेरक विश्वतत्त्वा**'चा सर्जनशील विकास होय. या विकासाची अंतिम परिणति मानवाला श्रेय-स्कर अशा उच्चतम मूल्यांच्या–त्यांतहि जें शिरोधार्य मूल्य 'शिव' त्याच्या विकसनांत होणार असल्यामुळें आपण विश्वाच्या उत्क्रान्तीमागील मूळ प्रेरक शक्तीला या 'प्रेरक विश्वतत्त्वा'ला '**प्रेरक ईश्वरतत्त्व**' किंवा '**प्रेरक शिवतत्त्व**' (elan divin, elan saint) असें म्हणणें उचित होईल.

### विश्वाचें प्रयोजन सफल करण्याचें साधन

वरील विवेचनावरून हें स्पष्ट होईल कीं, शेवटीं विश्व हें 'आत्म्यां'चा एक समाज किंवा कुटुंब असून



अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हा समाज अनादि कालापासून जीवनाचीं नवनवीं रूपें व नमुने सतत निर्माण करीत आला आहे. या विविध जीवनामधून 'प्रेरक विश्वतत्त्व' सारखें आविष्कृत होत आलें आहे. विश्वाच्या उत्क्रान्तीच्या बुडाशीं जो हेतु किंवा प्रयोजन आहे त्याचीं हे 'आत्मे' वाहनें, साधनें किंवा इन्द्रियें होत. शिवाय हे आत्मे नुसते तथाकथित परमाणू नव्हत, किंवा कारखान्यांतून बाहेर पडणाऱ्या एकछाप वस्तूंप्रमाणें, व्यक्तित्वशून्य नव्हेत. हे सर्व आत्मे व्यक्तित्वसंपन्न, आपल्या परीनें सर्वाङ्गपरिपूर्ण, सामग्र्यसंपन्न असून, प्रत्येकजण इतका वैलक्षण्ययुक्त आहे कीं, एकाची जागा दुसरा भरून काढूं शकणार नाहीं. लाइब्निझचें 'अलक्षणीयांचें ऐक्य' ('Identity of the Indiscernibles') हें तत्त्व म्हणजे त्या तत्त्वज्ञानें या व्यक्तित्वसंपन्न आत्म्यांचें वैशिष्ट्य किंवा वैलक्षण्य मान्य केल्याची खूणच होय. म्हणूनच मानव हे विश्वाचे घटक असून विश्वाच्या प्रयोजनाचे वाहक आणि तें प्रयोजन अधिकाधिक सफल करण्याचीं साधनें होत. हे मानवी आत्मे किंवा चैतन्यें ईश्वरी प्रेरणेचे साक्षात् स्फुलिंग होत. मूळ 'प्रेरक विश्वतत्त्वा'चें जें उत्स्फूर्त स्वातंत्र्य आणि कर्तृत्व त्यांत हे सर्व आत्मे आपापल्या परीनें आपल्या मर्यादांत पण हक्काचे अंशभागी आहेत. ते स्वतः आपल्या परीनें सामग्र्यसंपन्न (Integral) असून एका विराट् समाजाचे घटक आहेत. हा विराट् समाज व्यक्तिनिरपेक्ष (Impersonal) नाहीं. तो व्यक्तींचा, परस्परसंबद्ध व्यक्तींचा बनलेला आहे. पण म्हणून हा समाज व्यक्तींची केवळ बेरीज नाहीं. व्यक्तींचा बनलेला हा समाज पुन्हां व्यक्तींच्या अतीत आहे. या समाजाचे जे हे मानवी घटक त्यांच्या द्वारें विश्व स्वसंवित्तिशील, जिज्ञासु व आपल्या श्रेयाविषयीं जागरूक बनतें. मानवी घटकांच्या द्वारेंच विश्व जणू स्वतःकडे निरखूं लागतें, आपणां स्वतःस जाणण्याचा, आपल्या स्वरूपज्ञानानंदाचा आस्वाद घ्यावयाचा आणि आपलें पुढील मार्गक्रमण आंखण्याचा प्रयत्न करीत असते. हें मार्गक्रमण कोणत्या भव्य भवितव्याकडे चालूं आहे तें पुढील काळच ठरवील. विश्वोत्क्रान्तीच्या या महान् ग्रंथांतील पुढील भवितव्याबद्दलचीं अज्ञात पानें एखाद्या हस्तलिखिताप्रमाणें आपण वाचूं शकूं असा आपण मानवांनीं आव आणूं नये. हें भवितव्य आपणाला अज्ञात, गूढ, 'गुहाहित'च रहाणार. क्वचित् भाग्यवशात् मधून मधून चमकून जाणाऱ्या अंतर्ज्ञानाच्या किंवा स्फूर्तीच्या उन्मेषांमुळें या भवितव्याचें किंचित् ओझरतें दर्शन होतें. पण तें क्षणिकच. सुदूर भूतकाळांत किंवा सुदूर भविष्यकाळांत अवगाहन करून त्याचा थांग लावणें मानवांना अशक्यच आहे. सर्व बाजूंना अज्ञानाचें दाट धुकें पसरलें असावें व मध्येंच एक ज्ञानकिरणाची तिरीप पडलेली असावी असें मानवांचें जीवन होय. पण एवढें खरें कीं ही इवलीशी प्रकाशाची तिरीप देखील जीवनांतील कानेकोपरे उजळून टाकण्यास आणि पुढील मार्गदर्शनापुरतें विश्वाचें ईषत् दर्शन करून देण्यास पुरेशी आहे.

तत्त्वज्ञानी वृत्ति किंवा दृष्टि स्पष्ट करण्याकरितां वर जीवनाच्या सत्ताशास्त्रीय पायाचें विवेचन केलें. आतां तत्त्वज्ञानी वृत्तीचा जो दुसरा घटक म्हणजे जीवनाचें मानसशास्त्रीय अधिष्ठान त्याचें विवेचन करावयाचें आहे.

## सृष्टीची अमूल्य देणगी : मन

जीवन जर योग्य रीतीनें जगायचें, तर माणसानें स्वतःला जाणून घेतलें पाहिजे. स्वतःला जाणून घेणें म्हणजेच स्वतःचें मन जाणून घेणें होय. मानसशास्त्र म्हणजे मनाचा आणि मनाचा आविष्कार ज्यांतून होतो त्या वर्तनाचा अभ्यास होय. पण मग मन म्हणजे काय ? त्याचें स्वरूप व कार्य कोणतें ? मानवी जीवनक्रमणाला त्याचा उपयोग काय ? — इत्यादि अनेक प्रश्न निर्माण होतात. अशा प्रश्नांचीं नाना प्रकारचीं उत्तरें मानसशास्त्रज्ञांनीं दिलीं आहेत. त्याबाबत वाद अजूनहि चालूच आहेत. त्या वादांत न शिरतां मानसशास्त्रविषयक आधुनिक ज्ञानाचा निष्कर्ष प्रस्तुत लेखकास काय वाटतो, तें संक्षेपानें मांडावयाचें आहे.

मन आणि जीवसृष्टि यांचा उदय व विकास बरोबरच घडून आला आहे. त्यांचीं क्षेत्रें व सरहद्दी समान आहेत. अनुभवानें शिकण्याचें सामर्थ्य हें जें मनाचें किंवा बुद्धीचें हमखास अचूक लक्षण, तें जीवसृष्टीच्या निकृष्ट श्रेणींतील अगदीं खालच्या प्रकारचा जो एकपेशी अमीबा नांवाचा जीव त्याच्या ठिकाणीं सांपडतें, हें तुलनात्मक मानसशास्त्रानें सिद्ध करून दाखविलेंच आहे.— जीवनप्रक्रियेचा सारा गाभा म्हणजे जीवाची, साध्यानुसार साधनें व साधनानुसार साध्यें जुळवून








अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

घेण्याची – अनुरूपवर्तिनी प्रवृत्ति होय. ती प्रवृत्ति घडवून आणायचें एक साधन म्हणून सृष्टीनें जीवाला मनाची अमूल्य देणगी दिली आहे. जीवाच्या जीवन-प्रेरणेची परिपूर्ति या अनुरूपवर्तिनी प्रवृत्तींत आहे. या अनुरूप प्रवृत्तीचे सूक्ष्मातिसूक्ष्म आविष्कार करावयाचें सामर्थ्य जसजसें जीवसृष्टींत विकसित होत जातें, तसतसा जीवसृष्टींत मनाचा विकास होत जाऊन जीव-सृष्टीला स्पष्ट 'मानसिक' स्वरूप येतें. प्रत्यक्ष जीवनच प्रगत होत होत मनांत परिणत होतें. म्हणजे शेवटीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें मन हेंच विश्वोत्क्रान्तीच्या एका टप्प्यावर डोळस असें प्रेरक तत्त्व ( elan psychique ) बनतें.

## हेतुप्रेरणांचा संघात

मात्र हें मूळचें प्रेरकतत्त्व एकजिनसी किंवा एकात्म न रहातां तात्काळ अनेकजिनसी बनतें. अनेक हेतुप्रेरणा ( motives ) त्यांत संघटित होतात. आधुनिक मानस-शास्त्र हें प्रामुख्यानें हेतुप्रेरणांचेंच मानसशास्त्र असून त्याच्या साहाय्यानें मानवी जीवनांमधील हेतुप्रेरणांचें गूढ उलगडावयाचा पुष्कळच प्रयत्न झाला आहे. मन म्हणजे विशिष्ट दिशेनें प्रेरित झालेल्या हेतूंची एक संघटना होय. मग त्या हेतुप्रेरणा 'उत्क्षेपक्रिया ( reflexes ),' 'जन्मजात संवयी', 'गरजा', 'प्रेरणा', 'सहजप्रेरणा', 'सहजप्रवृत्ति' इत्यादि कोणत्याहि नांवांनीं संबोधल्या जावोत. हा सिद्धान्त आतां साधारणपणें सर्वमान्य झाला आहे. या सिद्धान्ताला ही मान्यता मिळवून देण्याचें श्रेय बव्हंशीं मॅक्डूगल व फ्रॉइड यांच्या संशोधनालाच आहे. मॅक्डुगलनें 'सहज प्रेरणा' ( Instincts ) व 'प्रेरक मनस्तत्त्व' ( horme ) हे दोन्हीहि सिद्धांत मांडून, ह्या दोन्हींहि एकच आहेत असें दाखविण्याचा प्रयत्न केला. त्यानें सहजप्रेरणांची एक यादीच्या यादीच बनविली. पण त्याचीहि 'सहज प्रेरणां'ची उपपत्ति पुढील शास्त्रज्ञांना मान्य झाली नाहीं. त्याच्या उलट, त्याची 'प्रेरक मनस्तत्त्वा'ची जी उपपत्ति तिला इतकी मान्यता मिळाली कीं आज मानसशास्त्रांतील तो एक स्थिर असा मूलसिद्धांत गणला जातो.—फ्रॉइड-नें आपली कामप्रेरणेची उपपत्ति मांडली. ही आरंभीं एकजिनसी व कामातिरेकात्मक कल्पना होती. ( फ्रॉइड-नें या 'कामा'ची जी कल्पना मांडली आहे ती पाहतां त्याचा 'काम' म्हणजे जीवनाचें सर्व सामान्य सुख होय ). पण पुढें त्यानें ही आपली उपपत्ति संशोधन-पूर्वक बदलून ती अधिक व्यापक केली. त्यानें मूळ कामवृत्तीच्या उपपत्तींत दोन ध्रुवप्रवृत्तींची–एक जीवनप्रवृत्ति व दुसरी मरणप्रवृत्ति अशी – भर घातली. शिवाय त्यानें मनःप्रदेशाचे तीन भाग – एकावर एक थर कल्पिले : तदात्मा ( id ), अहमात्मा ( ego ), अत्यात्मा ( superego ). जीवसृष्टीच्या जीवनांतील हेतुप्रेरणांचें हें एक विश्लेषणात्मक वर्गीकरणच होय.– अशा रीतीनें दोन प्रतिभाशाली मानसशास्त्रज्ञांनीं दोन निरनिराळ्या दिशांकडून–मॅक्डूगलनें प्राणिजीवनाचा व सामाजिक जीवनाचा आणि फ्रॉइडनें विकृत व अबोध मनाचा – मानवी मनाचा अभ्यास व संशोधन करून मानवी मन हें कसें हेतुप्रेरित व हेतुप्रेरणात्मक आहे या विषयींचा जो सिद्धान्त मांडला तो निःशंकपणें मान्य झाला आहे.

## सामर्थ्यसंपन्न व्यक्तित्व

जीवन हें हेतुप्रेरणामय खरें. पण जीवनाच्या विरोध-विकासवादी तर्कशास्त्रानुसार, या हेतुप्रेरणा सगळ्याच कांहीं एका दिशेनें प्रवृत्त झालेल्या किंवा परस्परांशीं सुसंगत नसतात. या हेतुप्रेरणा प्राण्याला नाना दिशांकडे ओढतात, प्रवृत्त करीत असतात. त्यामुळें प्राण्यांचें जीवन म्हणजे अनेक दिशांकडे सैरावैरा धांवणाऱ्या प्रवृत्तींचें – त्या प्रवृत्तींच्या सहकार्याचें व संघर्षाचें क्षेत्र बनत असतें. यांतूनच वैफल्य, निरुद्धवासनाजन्य मनोविकृति या गोष्टी उद्भवतात. अलीकडील विज्ञानानें घडवून आणलेल्या सुधारणेच्या प्रगतीबरोबर, विविध, बहुधा संघर्षात्मक हेतुप्रेरणांनीं भरलेल्या मनाचें स्वरूपहि कांहीं नवीनच असें दृग्गोचर व्हावयास लागलें आहे !

यांतूनच जीवन-विषयक आणखी एक नवीन प्रश्न उभा रहातोः तो म्हणजे या भिन्न हेतुप्रेरणांचें संघटन आणि समन्वय कसा साधायचा हा होय. या हेतुप्रेरणांना नीट वाट मिळून त्यांचा योग्य समन्वय झाला नाहीं, तर जीवनाच्या अनुरूपवर्तिनी प्रवृत्तीच खुंटून जातील आणि विश्वाची मूळ प्रेरणा व जीवन अपूर्ण व असफलच रहातील. परंतु सुदैवानें आधुनिक मानसशास्त्रांच्या श्रेष्ठ प्रणेत्यांनीं हेतुप्रेरणांचा समन्वय कोणत्या प्रक्रियेनें घडून येतो याचें उद्बोधक विवेचन केलें आहे. मानसिक जीवनां-तील मूळ नैसर्गिक प्रेरणांच्या अभ्यासाबरोबरच, त्यांनीं या प्रेरणांत अभिसंधाना-( conditioning ) नें किंवा



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शिक्षणानें, विशिष्ट परिस्थितीच्या योगानें कसें परिवर्तन घडवून आणतां येईल याचेंहि संशोधन त्यांनीं केलें आहे. मानसिक जीवन हें मूळच्या नैसर्गिक हेतुप्रेरणा आणि संपादित हेतुप्रेरणा या दोहोंमिळून बनलेलें आहे. मनाच्या विविध विषयांभोंवतीं या हेतुप्रेरणा जमत जाऊन संघटित होतात. अशा संघटित हेतुप्रेरणांना 'स्थिर भाव' (sentiments) म्हणतात. अशा रीतीनें स्थिर भाव म्हणजे नैसर्गिक व संपादित हेतुप्रेरणांच पुंजच असून जीवनांतील सव प्रकारच्या विषयांना ते चिकटून असतात.

हे स्थिरभाव संघटित मनाचे किंवा मनुष्याच्या व्यक्तित्वाचे अंतिम घटक होत. पण केवळ असल्या स्थिर भावांची घडण होऊन भागत नाहीं. स्थिर भावांमुळें हेतुप्रेरणांचा समन्वय व सुसंगति केवळ अंशतः साधतात. स्वतः निरनिराळया स्थिर भावांमध्येंच जर विसंगति व संघर्ष उत्पन्न झाला तर त्या आपत्तीचा परिहार कसा करावयाचा हा प्रश्न शिल्लक रहातोच. जीवनांतील नाना प्रकारच्या सूक्ष्म, हळुवार वासना आणि उत्कट गरजा यांना तोंड देतांना स्थिर भावांमध्येंच संघर्ष माजतो. त्यामुळें त्या स्थिर भावांनाच निराळें वळण लावून त्यांचें पुन्हां पुन्हां मूल्यमापन होणें आवश्यक ठरतें. यांतूनच स्थिर भावांमध्यें, हे उच्च, हे कमी प्रतीचे अशी विविध श्रेणींची उतरंड उत्पन्न होते. शेवटीं एका श्रेष्ठ ठरलेल्या स्थिरभावाच्या प्रभुत्वाखालीं बाकीचे स्थिरभाव संघटित होतात. असें झालें तरच शेवटीं माणसाचें व्यक्तित्व समन्वित, सुसंघटित, एकमुखी व सुसंगत बनते. असें संपूर्ण, सामर्थ्यसंपन्न व्यक्तित्व संपादन करून घेणें हें मानसिक जीवनाचें अंतिम कार्य व ध्येय होय.

### नैतिक ध्येयाकरितां समग्रदृष्टीची आवश्यकता

तत्त्वज्ञानी वृत्तीचा तिसरा घटक म्हणजे नीतिमत्ताविषयक दृष्टिकोन होय. मानवी जीवनाचें ध्येय काय आहे किंवा काय असावें, जीवनाच्या सर्व आशा–आकांक्षांचें अंतिम उद्दिष्ट काय याचा प्रामुख्यानें विचार नीतिशास्त्र करतें. जेव्हांपासून मानव विचार करूं लागला तेव्हांपासून नीतिविषयक विचारांना त्याच्या मनांत स्थान मिळालें आहे. नीतिविषयक प्रश्नांनाहि इतिहासांत विविध प्रकारचीं उत्तरें विचारवंतांनीं दिलीं आहेत. स्थूल मानानें सांगावयाचें झाल्यास, नीतिशास्त्राबाबत प्रतिपादिल्या गेलेल्या उपपत्तींचे दोन वर्ग पडतातः ( १ ) उपपत्तींचा एक प्रकार असा कीं नीतिमान् जीवन म्हणजे विशिष्ट नियमानुसारें चालणारें जीवन होय. मग तो विशिष्ट नियम म्हणजे जमातीचा कायदा असो, प्रेषितानें सांगितलेला ईश्वरी कायदा किंवा धर्म असो, किंवा बुद्धीनें वा सदसद्विवेकानें वा नैतिक जाणिवेनें घालून दिलेला नियम असो. ( २ ) नीतिविषयक उपपत्तींचा दुसरा प्रकार असा कीं ज्यांत नीतिमान् जीवन म्हणजे कांहीं सुनिश्चित ध्येय पुढें ठेवून तें गांठण्याकरितां आचरिलेलें जीवन होय असें मानलें जातें. हें सुनिश्चित ध्येय व्यक्तीचें परमसुख, जास्तींत जास्ती लोकांचें जास्तींत-जास्ती सुख, किंवा व्यक्तित्वाचा परमोच्च विकास यांपकीं असूं शकेल. नीतीचा विचार करतांना तो, मानवाचें या विश्वांतील स्थान आणि मानवी मन किंवा स्वभाव यांपासून वेगळा काढून तुटकपणें करतां येणार नाहीं हें लक्षांत ठेवणें अगत्याचें आहे. कित्येक नीतिशास्त्रज्ञांकडून ही चूक झाली आहे. कान्टसारखे बुद्धिवादी आणि मिलसारखे सुखवादी हें देखील या चुकीपासून मुक्त नाहींत. मनुष्यानें काय व्हावें किंवा काय करावें याचा विचार, मनुष्य आहे कसा याच्या अनुरोधानेंच होऊं शकतो. म्हणूनच नीतिशास्त्रविषयक उपपत्ति जर निर्दोष व्हायची असेल तर ती विश्वांतील मानवाचें स्थान निर्णीत करणाऱ्या सत्ताशास्त्रीय उपपत्तीवर आणि मानवी मनाचें विश्लेषण करणाऱ्या मानसशास्त्रीय उपपत्तीवर आधारली गेली पाहिजे. प्रस्तुत लेखांत आतांपर्यंत सत्ताशास्त्रीय व मानसशास्त्रीय उपपत्तींचें संक्षिप्त विवेचन केलेंच आहे. मानव हा विश्वाचा एक घटक आहे हा सत्ताशास्त्रीय उपपत्तीचा निष्कर्ष आहे. आणि मानव हा क्रियाशील असून तो हेतुप्रेरणेनें, विशिष्ट प्रयोजनाच्या दिशेनें प्रवृत्त होत असतो हा मानसशास्त्रीय उपपत्तीचा निष्कर्ष आहे. मानसशास्त्रीय उपपत्तीच्या वरील निष्कर्षांत प्रस्तुत स्थळीं आणखी थोडी भर घालायची आहे. ती अशी : मानवी स्वभावांत प्रेरणाप्रेरित क्रियाशीलता ( activity and motivation ) आहे व तो प्रधान घटक आहे. या प्रधान घटकाबरोबरच त्याच्या अनुषंगानें रहाणारे ज्ञान आणि भावना हे दोन घटकहि मानवी स्वभावांत आहेत. मनुष्याचें समग्र व्यक्तित्व म्हणजे ज्ञान, भावना आणि क्रियाशील इच्छाशक्ति यांचा









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

समन्वयच होय. म्हणून मानवाचें नैतिक ध्येय तो विश्वाचा एक घटक आहे या गोष्टीशीं आणि त्याच्या जटिल व्यक्तित्वाशीं सुसंवादी व योग्य असेंच असलें पाहिजे, हें ओघानेंच येतें.

## आत्मज्ञानाची साधना

सत्ताशास्त्रीय व मानसशास्त्रीय दृष्टीनें आपलें जें स्थान आहे तें ओळखून त्या नात्यानें आपणांवर आलेल्या जबाबदाऱ्या व कर्तव्यें योग्य तऱ्हेनें पार पाडणें हेंच मानवाचें नैतिक ध्येय होय. सत्ताशास्त्रीय दृष्टीनें त्याचें कर्तव्य हें कीं, आपणांस उत्क्रान्तिशील विश्वाचें, व उत्क्रान्तीच्या उद्दिष्टाचें जें ज्ञान होईल त्या ज्ञानानुसार, विश्वशक्तीचें वाहन, साधन किंवा इंद्रिय आपण होऊन आनंदानें बनणें. मानसशास्त्रीय दृष्ट्या मानवाचें कर्तव्य हें कीं आपल्या जटिल व्यक्तित्वांतील ज्या प्रमुख प्रेरणा व भावभावना त्यांची सुसंगत, समन्वयात्मक व निरामय प्रगति साधून आपल्या संपूर्ण व्यक्तित्वाचें साफल्य साधणें. अतिभौतिक किंवा सत्ताशास्त्रीय दृष्ट्या व मानसशास्त्रीय दृष्ट्या जीं कर्तव्यें वर सांगितली आहेत तीं एकमेकांपासून वेगळीं नाहींत व तशीं ती वेगळीं मानावयाचें कारणहि नाहीं. उलट, हीं दोन्हींहि प्रकारचीं कर्तव्यें शेवटीं एकत्र येऊन एकरूपच होतात. तसा विचार केला तर शेवटीं माणसाचें मन व व्यक्तित्व हें तरी शेवटीं विश्वांतून व विश्वाच्या प्रक्रियेंतूनच उत्क्रान्त किंवा विकसित झालेल्या विश्वाचा व विश्वप्रक्रियेचाच एक घटक आहे. मानवाच्या सर्व रोम-रोमांतून ती विश्वाची उत्क्रान्तिशील शक्ति सारखी स्फुरत आणि सळसळत आहे. म्हणूनच माणूस आपल्या व्यक्तित्वाच्या विकासाच्या दृष्टीनें आपली कर्तव्यें करीत असतांना तो आपोआपच अपरिहार्यपणें आपलीं कर्तव्येंहि पार पाडीत असतो. तात्पर्य, आपल्या व्यक्तित्वाचा सुसंगत विकास करून साफल्य साधणें किंवा दुसऱ्या शब्दांत सांगायचें तर आपल्या सर्व अप्रकट-प्रकट. शक्तींना जाणून, त्यांचा विकास करून ' आत्मसाधना ' करणें हेंच खरें मानवाचें नैतिक ध्येय होय.

## ज्ञान, कर्म, भक्ति

आत्मज्ञानाचाहि अर्थ दोन दृष्टींनीं समजून घेतला पाहिजे. एक दृष्टि अशी कीं, मानवाच्या व्यक्तित्वांत ज्ञान, भावना आणि कृति हे जे तीन घटक आहेत त्यांचा संपूर्ण विकास आत्मज्ञानांत अभिप्रेत असला पाहिजे. व्यक्तित्वांतील या तिन्हीहि घटकांचें कार्य प्रकृतिभेदानुसार तारतम्य राखून बरोबरच चालूं राहिलें पाहिजे. शेवटीं कृतीचा आधार ज्ञान होय व भावना त्या कृतीमागील प्रेरकशक्ति होय. ज्या माणसाच्या कृतीला ज्ञानानें योग्य दिशा लागून ती कृति ज्ञानानें उजळली आहे व त्या कृतीच्या मागें भावनेचा जोर आहे, त्या माणसाचें जीवन आदर्श मानलें पाहिजे. अर्थात् निरनिराळ्या माणसांत प्रकृतिभेदांप्रमाणें आपणांस फरक आढळून येईल. ज्या माणसाचें व्यक्तित्व ज्ञानप्रधान आहे, त्याची भावना व कृति ही ज्ञानालाच पोषक होतील. या उलट, ज्या माणसाचें व्यक्तित्व भावनाप्रधान आहे, त्याच्या व्यक्तित्वांत ज्ञान देखील भावनेलाच पूरक होईल व कृति भावनेला वाट करून देईल. ज्ञान, कृति व भावना यांच्या तारतम्यभेदावर अधिष्ठित अशी जी ही मानवी व्यक्तित्वाच्या विकासाची त्रिविध कल्पना तीच गीतेमध्यें धार्मिक परिभाषेत सांगितलेले ज्ञानयोग, कर्मयोग आणि भक्तियोग यांच्या बुडाशीं आहे, असें आढळून येईल.

## ' स्वधर्म '-पालन

समाजानें जी परिस्थिति माणसाला उपलब्ध करून दिलेली आहे त्या परिस्थितींत, सामाजिक जीवनाशीं सुसंवाद राखून माणसानें आपल्या व्यक्तित्वाचा विकास करून घेणें हा आत्मज्ञानाचा दुसरा अर्थ होय. माणसाचें व्यक्तित्व हें समाजाचेंच फळ असून, माणसाच्या व्यक्तित्वाला सामाजिक जीवनांत विशिष्ट स्थान व विशिष्ट कार्य असतें, ही गोष्ट प्राचीन काळीं प्लेटो-ॲरिस्टॉटल यांनीं व आधुनिक काळीं हेगेलचेंच सूत्र पुढें चालवून ब्रॅड्ले, ग्रीन, आणि मुरहेड या तत्त्वज्ञान्यांनीं स्पष्ट केली असून, नीतिशास्त्राच्या दृष्टीनें तिचें महत्त्वहि त्यांनीं प्रतिपादिलें आहे. आधुनिक मानसशास्त्रीय संशोधनानेंहि त्याला भरपूर दुजोरा मिळतो. म्हणून नीतिशास्त्राच्या दृष्टीनें आत्मज्ञानाचा अर्थ असा कीं, सामाजिक जीवनाचा एक घटक म्हणून मनुष्यावर ज्या जबाबदाऱ्या येतात त्या त्यानें पूर्णपणें पार पाडल्या पाहिजेत. गीतेनें ज्याला ' स्वधर्म ' म्हटलें किंवा प्लेटोनें ज्याला ' न्याय ' ( Justice ) असें संबोधिलें आहे त्या ' स्वधर्मा'नुसार किंवा



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

न्याया'नुसार येणारीं कर्तव्यें मनुष्यानें पार पाडलीं पाहिजेत.

स्वधर्माचें किंवा न्यायाचें परिपालन कळकळीनें व निश्चयानें आपल्या दैनंदिन जीवनांत करून दाखविणें हाच खरा नैतिक पुरुषार्थाचा किंवा आत्मज्ञानाचा प्राण होय. अशाच प्रकारच्या जीवनांत त्याग आणि भोग यांचा मधुर मेळ आढळून येईल, व कमी प्रतीच्या हेतुप्रेरणांना उदात्त वळण लागून त्या शेवटीं उच्च प्रेरणांत विलीन होतील. अशा समन्वयांतूनच, समाजाशीं व विश्वाशीं एकजीव व सुसंवादी बनलेलें असें सुंदर व्यक्तित्व विकसित होईल.

## धर्म हा जीवनमंदिराचा कळस

मानवी जीवन ही एक मंदिरासारखी सुंदर आध्यात्मिक शिल्पकृति अशी कल्पना करून तिचा पाया सत्ताशास्त्रीय, अधिष्ठान मानसशास्त्रीय आणि तिचें मुख नीतिमत्तेकडे आहे हें आपण वर पाहिलें. आतां या सर्वांवर कळस म्हणजे त्या मंदिराच्या सुंदर पवित्र शिखरस्थानीं धर्माची योजना आहे. माणसावर नैतिक कर्तव्यें करावयाची जबाबदारी असते. या नैतिक कतव्यांना अंतिम आधार व बल ज्या समुचित श्रद्धांमधून व वृत्तींमधून मिळतें त्या श्रद्धा व वृत्ती धार्मिकच होत. मानवाचें जीवन, विशेषतः त्याचें नैतिक अंग हें समाजनिबद्ध असून, त्याचा अर्थ सामाजिक दृष्टीनेंच लागूं शकतो. जिवंत समाजाचा एक घटक आणि तसा घटक असल्याची जाणीव यांतून हीं नैतिक कर्तव्य उत्पन्न होत असतात. परंतु ज्या विराट् परिस्थितीचा मानव घटक आहे त्या परिस्थितीचा समाज हा एक जवळचा दिसणारा भाग आहे. त्यापेक्षांहि पलीकडचा, दूर पण अंतिम मूलाधार असलेला भाग म्हणजे जें विश्व त्याचाच शेवटीं मानव हा घटक होय. म्हणून नैतिक कर्तव्यांचा अंतिम आधार विश्वच होय. मी नीतिमान् असावें, अशी केवळ माझ्या भोंवतालच्या समाजाचीच अपेक्षा आहे असें नाहीं, तर माझ्या नजीकच्या समाजाच्या पलीकडे असलेलें जें विश्व त्याची देखील तीच अपेक्षा आहे. नीतिमान् असणें म्हणजे समाजाशींच नव्हे तर शेवटीं विश्वाशीं देखील समरस होणें होय. म्हणून मानवाच्या नैतिक जीवनाचा व कर्तव्यांचा अंतिम आधार विश्वच होय. आपल्याभोंवतीं आपणांस जें गोचर होतें त्यापलीकडे जें अंतिम विश्वतत्त्व—धर्मशास्त्रांतील किंवा प्रेषितांच्या धर्मांतील ईश्वर तो हाच—त्याच्याशीं आपला जिव्हाळ्याचा संबंध आहे ही जी मानवास जाणीव असते ती जाणीव म्हणजेच धर्म होय. ही जाणीव हृदयांत खोल भिनली, आपल्या जीवनांतील कर्तव्यांचा अंतिम आधार हीच जाणीव होय हें ज्ञान जर रुजलें, यांतून उत्पन्न होणाऱ्या विलक्षण तळमळीनें आपलें सर्व जीवन व्यापून टाकलें, आपण आपलीं वैश्विक किंवा दैवी कर्तव्यें पार पाडलीं असून आपल्या जीवनाचें सार्थक झालें ही जाणीव झाली, तर आपल्या जीवनावर धर्माचा कळस चढला असें म्हणावयास हरकत नाहीं. जीवनाच्या या उच्चतम पातळीवर, प्लेटोनें म्हटल्याप्रमाणें, माणसास अशी प्रतीति येते कीं, आपण ईश्वराचें किंवा विश्वाचें एक 'साधन' 'खेळणें' ( chattel ) आहोंत. या जाणीवेंतून स्वाभाविकपणेंच प्रत्यक्ष जीवनांत एक विनम्रतेची वृत्ति उत्पन्न होते. धार्मिक वृत्तीचा गाभाच, तत्त्वज्ञानी व आध्यात्मिक वृत्तीचा कळसच म्हणजे ही विनम्रतेची वृत्ति होय.

---

## जीवनांतील दोन शक्ती

यंत्रामध्यें दोन शक्ती असतात : एक, त्या यंत्राला गति देणारी; व दुसरी, त्यानें कोणत्या दिशेनें कार्य करायचें तें दाखविणारी. माणसाच्या जीवनांतहि दोन शक्ती असतात. एक शक्ति जी माणसाच्या जीवनाला गति देते तिला 'श्रद्धा' म्हणतात. ती माणसाच्या प्राणांतून निर्माण होते. दुसरी शक्ति त्याच्या जीवनाची दिशा दाखविते. तिला 'बुद्धि' म्हणतात. हीच माणसाची ज्ञानशक्ति होय. या दोन्ही शक्तींची माणसाला जरूर आहे.

— आचार्य विनोबा









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. मधुकर जावडेकर

# सीमेंटच्या उद्योगधंद्यांतील अर्थप्रवाह

भारताच्या आर्थिक नियोजनासाठीं मिश्र-अर्थ-व्यवस्थेचें तत्त्वज्ञान स्वीकारलें आहे हें आतां सर्वश्रुतच आहे. औद्योगिक अभिवृद्धीचा कार्यक्रम दोन भिन्न क्षेत्रांत विभागला असून, सरकारनें पुरस्कृत केलेले, साहाय्य दिलेले किंवा प्रत्यक्ष सरकारच्या मालकीचे असलेले कांहीं उद्योगधंदे एका विभागांत आहेत. हा सरकारी किंवा निमसरकारी विभाग सरकारी क्षेत्र ( Public Sector ) म्हणून ओळखला जातो. त्याउलट, भांडवल, नियंत्रण, योजना व उत्पादन यांवर संपूर्ण खाजगी मालकी असलेलें खाजगी भांडवलवाल्यांचें दुसरें क्षेत्र खाजगी क्षेत्र ( Private Sector ) म्हणून विदित आहे. पंचवार्षिक योजनेचा गेल्या तीन वर्षांचा आढावा विचारांत घेतां दोन्ही क्षेत्रांतील औद्योगिक प्रगति समाधानकारकपणें झाली आहे व होत आहे असें दिसून येते. कापड, साखर, सीमेंट, कागद, साबण असे भोग्य-वस्तूंचे उद्योगधंदे व्यवस्थित प्रगति करीत आहेत; तसेंच लोखंड व पोलाद, मोटारी इत्यादि मूलभूत उद्योगहि भरभराटत आहेत.

यांपैकीं खाजगी क्षेत्रांतील उद्योगधंद्यांचा विचार केला तर अनेक गोष्टी विचारांत घेण्याची आवश्यकता भासते. नुकतीच रिझर्व्ह बँकेनें खाजगी उद्योगधंद्यांच्या भांडवली गरजेचा व अडचणींचा विचार करण्यासाठीं एक समिति ( श्री. ए. डी. श्रॉफ यांच्या अध्यक्षतेखालील **श्रॉफ-कमिटी** ) नेमली होती व तिचा अहवालहि तयार होऊन बाहेर पडला आहे. त्याशिवाय इतर मार्गांनींहि या उद्योगधंद्यांची आर्थिक परिस्थिति समजावून घेण्याचा व शक्य तें साहाय्य देण्याचा प्रयत्न सरकारकडून होत असतो.

या सरकारी प्रयत्नांसमवेतच खाजगी उद्योगधंद्यांचे प्रयत्नहि चालू आहेत. त्यांतील महत्त्वाचा भाग म्हणजे संशोधन होय. त्रयस्थपणें आंकडे गोळा करून त्यांना बोलावयास लावणें हा अभ्यासाचा सर्वोत्तम मार्ग होय. आपल्या देशांत कोणत्याहि क्षेत्रांत आंकड्यांची व आंकडेवारीची कमतरता आहे ही ओरड सततची आहे. त्यामुळें ही गरज भागेल असें मूलगामी संशोधन जेथें जेथें होईल व ज्या प्रमाणांत होईल, तेथें आणि तेवढें देशास उपकारकच म्हटलें पाहिजे.

खाजगी उद्योगधंद्यांच्या आर्थिक परिस्थितीचा असा अभ्यास करून निष्कर्ष काढण्याचा प्रयत्न मुंबईची एक संस्था करीत आहे. 'असोसिएशन ऑफ इंडियन ट्रेड ॲण्ड इंडस्ट्री' ही ती संस्था होय. या संस्थेनें आतांपर्यंत 'लोखंड व पोलाद' आणि 'सीमेंट' या उद्योगधंद्यांच्या आर्थिक परिस्थितीची पहाणी प्रसिद्ध केली आहे व सध्यां कापड, कागद इत्यादि इतर उद्योगधंद्यांचा अभ्यास चालू आहे.

या पहाणींपैकीं सीमेंटच्या उद्योगधंद्याबाबत केलेल्या पहाणीसंबंधीं एक पुस्तिका ( Financial Trends in the Cement Industry, The Association of Indian Trade and Industry, Bombay, 1954 ) प्रसिद्ध झाली आहे. त्या पुस्तिकेंत सादर केलेलें संशोधन व निष्कर्ष प्रस्तुत लेखांत संक्षेपानें द्यावयाचें योजिलें आहे. त्या पुस्तिकेला लिहिलेल्या पुरस्कारांत शेठ तुलशीदास किलाचंद ( सदर संस्थेचे अध्यक्ष ) लिहितात कीं, " या अभ्यासांतील पृथक्करण सदर धंद्यांतील कंपन्यांचें १९३७ ते १९५१ पर्यंतचे ताळेबंद व नफा-तोटापत्रकें यांचें एकीकरण (Integration) करून त्यावर आधारलें आहे. या अभ्यासामुळें प्रथमच एतद्विषयक सविस्तर स्वरूपाची आंकडेवारी उपलब्ध होईल व तीवरून उद्योगधंद्यांतील आर्थिक परिस्थितीचें सम्यक् आकलन होऊं शकेल. त्याबरोबरच औद्योगिक धोरण ठरविण्यासाठीं भक्कम व विश्वासार्ह असा पाया प्राप्त होईल. "

### भारतीय सीमेंट : उद्योग व इतिहास

भारतांतील सीमेंटच्या उद्योगधंद्यांत एकूण १५ कंपन्यांचा समावेश होतो. पैकीं दहा जुन्या आहेत व पांच नवीन आहेत. यांपैकीं महत्त्वाच्या दोन कंपन्यांच्या ( ए. सी. सी. व डालमिया ) कारखान्यांपैकीं कांहीं कारखाने पाकिस्तानांतहि आहेत. प्रत्येक कारखान्यांत सीमेंटचा उत्पादनखर्च निरनिराळा असून तो कारखान्याची जागा, उत्पादनपद्धति, कामगारवेतन, वाहातुकखर्च इत्यादि बाबींवर अवलंबून आहे. १९२४ मध्यें या धंद्यानें संरक्षणाची मागणी केली होती, पण ती फेटाळण्यांत आली. १९४२ ते ४६ या काळां









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सीमेंटची बाजारांतील किंमत केन्द्रसरकारच्या नियंत्रणाखालीं होती. १९४६ नंतर मात्र उत्पादकांशीं वेळोवेळीं केलेल्या अनौपचारिक वाटाघाटीवरच ती अवलंबून राहिली आहे. १९४९ नंतर सीमेंटचा बाजारभाव थोडा वाढविण्यांत आला. पण सरकारनें खरेदी केलेलें सीमेंट मात्र भावाबर ठराविक सूट घेऊनच विकत घेतलें.

या धंद्याची पुनःस्थापना व वाढ या दिशेनें अतिशय महत्त्वाकांक्षी योजना उत्पादकांपुढें आहेत. १९५५–५६ पर्यंत उत्पादन ५० लक्ष टन व्हावें अशी अपेक्षा आहे. प्रस्थापित उत्पादनक्षमता १९४६ मध्यें २० लक्ष टन होती ती १९५१ मध्यें ४० लक्ष टन झाली. प्रत्यक्ष उत्पादन १९४६ मध्यें १०·५ लक्ष टन होतें, तें १९५१ सालीं ३०·२ लक्ष टन झालें. हा काल बव्हंशीं चलनवाढीचा होता हें लक्षांत हवें.

## अभ्यासाची पद्धति व कांहीं निष्कर्ष

प्रस्तुत अभ्यासासाठीं सदर पंधरा कंपन्यांचे वार्षिक ताळेबंद व नफा-तोटापत्रकें विशिष्ट तऱ्हेनें विचारांत घेतलीं आहेत; त्यावरून १९३७ ते १९५१ या कालांतील एक प्रातिनिधिक पत्रक तयार केलें. तें करण्यापूर्वी सर्व कंपन्यांचे ताळेबंद एकत्रित ( Integrated ) करण्यांत आले. ताळेबंद लिहिण्याची प्रथा सर्वठिकाणीं प्रायः एकाच तऱ्हेची आहे. पण जेथें कांहीं भरीव बदल आहे असें आढळलें तेथें तत्सदृशसारखेपणा येईल अशा तऱ्हेनें आंकडे बदलून घेतले. हें सर्व करूनहि "हे निष्कर्ष केवळ प्राथमिक स्वरूपाची पाहणी म्हणूनच पत्करायचे आहेत." अतिशय सूक्ष्म अशी बिनचूक आंकडेवारी देतां येत नसली तरी या मुख्य निष्कर्षांचें स्वरूप व दिशा मात्र अबाधित राहातील असा भरंवसा आहे.

अशा प्रकारचें पृथकरण केल्यानंतर धंद्यांतील भांडवल, भांडवलवाढ व भांडवल-बांधणी (Capital formation ) यांचे प्रवाह कसे आहेत तें तपासून पाहिलें आहे. उद्योगधंद्यांतील उत्पादन-प्रक्रियेमधूनच हळुहळु भांडवल-वाढ होत राहावी व विशिष्ट कालावधीनंतर निरुपयोगी यंत्रसामग्री, इमारती इत्यादि भांडवली भाग पुनः उभारण्यासाठीं व भरपूर भांडवलसामग्री हाताशीं राहाण्यासाठीं वर्षानुवर्षे योग्य प्रमाणांत घट ( Depreciation ) बाजूला काढण्यांत यावी, हें धंद्याच्या सुदृढ अर्थस्थितीचें द्योतक आहे. भांडवलच खाऊन उपयोगांत आणलें जाणें किंवा आणावें लागणें रास्त नव्हे. तशी परिस्थिति या धंद्यांत आहे काय तेंच प्रामुख्यानें या अभ्यासांत पाहिलें आहे.

## भांडवल-बांधणीचा अभाव

प्रस्तुत अभ्यासाचा एक महत्त्वाचा निष्कर्ष असा कीं १९३७–५१ या कालांतील या धंद्याच्या सांपत्तिक स्थितीचा आढावा असें सांगतो कीं येथें भांडवलबांधणी-( Capital Formation ) चा संपूर्ण अभाव आहे. धंद्यास (१) उत्पादनसाधनें वगैरे विकत घेण्यासाठीं (२) कच्चा-पक्का माल इ० सततचा खर्च भागवण्यासाठीं भांडवलाची जरूर लागते.

भांडवल मिळवण्याचे मार्ग दोन. धंद्यांतर्गतचा मार्ग म्हणजे एकंदर नफ्यांतून सर्व तऱ्हेचा खर्च वजा जाता उरणारी शिल्लक. बाहेरून मिळणारें भांडवल म्हणजे विकलें गेलेलें, कर्ज, ठेवी, डिबेंचर्स आदि रूपानें मिळणारें. प्रस्तुत उद्योगधंद्यांत १९३७ ते ५१ या कालांतील भांडवलाचा आय-व्यय खालीं दिला आहे[1]. त्या आकड्यांवरून वट्ट भांडवलवाढ २१·०४ कोट रु. झाली असें दिसून येते. हा आंकडा कागदावरील आहे. याची प्रत्यक्षांत किंमत किती आहे हा प्रश्न अलग.

प्रथमदर्शनीं ही परिस्थिति मोठी समाधानकारक वाटते. पण वस्तुस्थिति तशी नाहीं. कारण ताळेबंद लिहिण्याच्या पद्धतींत एक दोष आहे.

---

१ भांडवलाचा आयव्यय ( १९३७ ते १९५१ )

| आवक | को. रु. | जावक | को. रु. |
|---|---|---|---|
| १. नवीन विक्रीस काढलेलें ... | १५·३५ | १. वट्ट भांडवलवाढ ... | १५·३० |
| २. मोकळी शिल्लक ... | ५·६९ | २. हातांतील मालमत्ता ... | ५·७४ |
| एकूण | २१·०४ | एकूण | २१·०४ |



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वर्षानुवर्ष बदलणाऱ्या पदार्थांच्या किंमती ध्यानीं घेऊन हिशेब लिहिला जात नाहीं. किंमतींचा चढउतार व हिशेबांतील आंकडे यांमध्यें कांहीं नातें असत नाहीं. वरील हिशेबी आंकड्यां-( Book Values )वरून स्पष्ट न होणारी एक गोष्ट अशी आहे कीं, या कालांत गुंतविलेल्या एकूण भांडवलापैकीं सुमारें दोनपंचमांश भाग नष्ट झाला आहे. म्हणजे या रकमेइतकें भांडवल घटीच्या स्वरूपांत धंद्यांत उरलें नाहीं. दुसऱ्या शब्दांत सांगायचें म्हणजे १९५१ च्या किंमतीप्रमाणें भागीदारांच्या १० ते ११ कोटी रुपये भांडवलाचा चक्काचूर झाला आहे. या भांडवल-विनाशास एक समर्पक शब्द या अभ्यासांत योजला आहे. तो म्हणजे "भांडवलाची धुपणी" ( Capital erosion ) हा होय. जमिनीची निष्काळजीपणानें सालोसाल धुपणी होत असते हें सर्वांना माहीत आहेच. तद्वतच उद्योगधंद्यांत भांडवलाची धुपणी होत आहे.

आतां खालील आंकड्यावरून १९३८-५१ मधील भांडवल-बांधणी स्पष्ट होईल. ही १९५१ च्या किंमती विचारांत घेऊन काढली आहे.

### प्रत्यक्ष गुंतवणूक

| | को. रु. |
|---|---|
| १. विकले गेलेलें | २३·०३ |
| २. मोकळी शिल्लक | ४·५१ |
| एकूण | २७·५४. |

### प्रत्यक्ष भांडवल-बांधणी

| | को. रु. |
|---|---|
| १. वट्ट स्थावरमत्ता | १५·८४ |
| २. हातांतील मत्ता वजा देणीं | ०·९५ |
| ३. एकूण-भांडवलबांधणी | १६·७९ |
| ४. भांडवल धुपणी | १०·७५ |
| एकूण | २७·५४. |

याचा अर्थ असा कीं भागीदारांनीं प्रत्यक्ष २७·५० को. रु. गुंतवले. पण (१९५१ च्या किंमतीप्रमाणें) धंद्यांच्या मालकीचे स्थावर व जंगम मालमत्तेच्या (Fixed to Current Assets ) स्वरूपांत फक्त १७ को. रु. एवढेंच भांडवल राहिलें. व ११ को. रुपये धुपून नष्ट झाले. हिशेबाच्या पद्धतींतील दोषामुळें हा अनर्थ ओढवतो. प्राप्तिकर भरण्यासाठीं हिशेब दाखवतांना घट ( Depreciation ) म्हणून बाजूस काढण्याची रक्कम मालमत्तेच्या खरीदलेल्या किंमतीवर आकारण्यांत येते. ही मालमत्ता निरुपयोगी झाल्यावर पुनः उभारण्यासाठीं जरूर त्या रकमेवर ( Replacement Cost ) आकारण्यांत येत नाहीं. याचा परिणाम असा कीं धंद्याचा नफा २० को. रु. वाढवून धरला गेला. असें धरलें नसतें तर या उद्योगानें या कालांत भरलेला ११·११ को. रु. प्राप्तिकर भरावा लागला नसता.

उत्पन्नाचे आंकडे खाली[२] दिले आहेत. या

२ १९३७ ते १९५१ : एकत्रित नफा-तोटा-पत्रकें.

| उत्पन्न | को. रु. | एकूण उत्पन्नाच्या शेंकडा प्रमाण. |
|---|---|---|
| १. उत्पादन ( मालविक्री इ० ) | १७७·३५ | ९८·०. |
| २. इतर | ३·६३ | २·०. |
| ३. एकूण उत्पन्न | १८०·९८ | १००·० |
| **खर्च** | | |
| ४. उत्पादन-खर्च | १००·४७ | ५५·५ |
| ५. कामगार वेतन इ० | २६·६६ | १४·७ |
| ६. इतर | १४·३७ | ७·९ |
| ७. एकूण खर्च | १४१·५० | ७८·१ |
| **आर्थिक तरतुदी** | | |
| ८. घाऊक नफा (३–७ ) | ३९·४८ | २१·८ |
| ९. घट ( Depreciation ) | १२·९४ | ७·१ |
| १०. वट्ट नफा ( ८–९ ) | २६·५४ | १४·७ |
| ११. करभरणी | ११·११ | ६·१ |



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आंकड्यांवरून असें दिसतें कीं धंद्याचें एकूण उत्पन्न ( १९३७ ते ५१ : १५ कंपन्या ) १८०.९८ को. रु. आहे. पैकीं उत्पादित मालाची किंमत एकूण उत्पन्नाच्या ९८ टक्के आहे, उत्पादन-खर्च ५५.५ टक्के, कामगार-वेतन १४.७ टक्के, मॅनेजिंग एजंटस् १.८ टक्के, घाऊक फायदा ३९.४८ को. रु. म्हणजे २१.८ टक्के आहे.

या आंकड्यावरून असेंहि दिसून आलें कीं उत्पन्न १९३७ पासून, ५१ पर्यंत सातपट वाढलें, खर्चहि तितकाच वाढला. नफा पांच पटींनीं वाढला. वाटपाई नफा [ घाउक नफा-( घट + कर ) ] चारपट वाढला. डिव्हिडंडस् सर्वांत कमी वाढले (१९३७ मध्यें ०.६१ को. रु.; १९५१ मध्यें १.६८ को. रु. ).[३]

अशा प्रकारें वरील पृथक्करणांतून खालील गोष्टी दिसून येतात. या उद्योगधंद्यांत १९३७ ते ५१ या कालांत घाऊक भांडवल ( Gross Capital ) ५० कोटींनी व वट्ट (Net) भांडवल २२ कोटींनीं वाढलें. या कागदावरील आंकड्यांचें १९५१ च्या किंमतीप्रमाणें रूपांतर केल्यावर असें आढळतें कीं भागीदारांनीं जरी २७.५ को. रु. अधिक गुंतवले तरी त्याचा परिणाम म्हणून धंद्यांच्या भांडवलबांधणींत फक्त १७ को. रु. ची वाढ झाली व बाकी ११ को. रु. भांडवल धुपून गेलें. याचें एक बलवत्तर कारण असें सांपडतें कीं, कर-भरणीसाठीं व उत्पादित मालाच्या किंमती ठरवितांना ज्या रकमेची आकारणी करण्यांत येते ती घट भांडवलाच्या पुनःस्थापने-( Replacement Cost )च्या प्रमाणांत न आकारतां सुरवातीच्या ( historical ) प्रमाणांत आकारली जाते हें होय. यामुळें धंद्याच्या नफ्याची आकारणी २० कोटींनी जादा झाली. व करभरणीहि ११ कोटींनीं वाढवून घेतली गेली.

## कर-आकारणीचें धोरण

वरील दोष सर्वच उद्योगधद्यांच्या बाबतींत आढळतो. यावर उपाय म्हणून १९४८ सालीं प्राप्तिकर-कायद्यांत कांहीं सुधारणा केली होती. पण त्याचा प्रत्यक्षांत फायदा झाला नाहीं. घट बाजूला काढण्यासाठीं भांडवलाची पुनःपुनः किंमत करण्याची तरतूद फ्रान्स, बेल्जम्, इटाली, जपान या देशांत आहे. आपल्याकडेहि कर चौकशी-समितीनें याचा विचार करावयास हवा.

## किंमतीविषयक धोरण

सीमेंटची किंमत ठरविण्याचें धोरणहि फारसें उदारपणाचें नाहीं. धंद्यांतूनच जरूर तें भांडवल उभें राहावें यासाठीं टारिफ-कमिशननें भांडवलावर १० टक्के व्याज सुटावें अशी शिफारस केली होती. तसें झालें असतें तर कर, कामगारांना द्यावयाचा बोनस, मॅनेजिंग एजंटस्चें कमिशन, डिव्हिडन्डस् व मोकळ्या शिलकीची उभारणी या साऱ्या गरजा भागवितां आल्या असत्या. पण सरकारनें ही सूचना धुडकावून लावली व ८ टक्के व्याज संमत केलें. (सरकारनें आपल्याला लागणारें सीमेंट मात्र ठराविक सूट देऊन कंपन्याकडून घ्यायचें असें ठरविलें आहे.) कोणी म्हणतील कीं 'यांवर सर्वसंमत असा तोडगा कोणता ? '. कारखानदार, भागीदार, कामगार व ग्राहक अशा सर्व हितसंबंधीयांना एकसमयावच्छेदेंकरून पटेल असा तोडगा, उत्पादनाची प्रस्थापित चौकट कायम ठेऊन, सुचवितां येणें अंमळ कठीण आहे हें खरें. पण आपल्या उद्दिष्टांची क्रमवारी एकदां लावल्यानंतर त्या उद्दिष्टाकडे जाण्याचा त्वरित मार्ग कोणता तें सुचणें सुबुद्धांना अवघड जाऊं नये.

याच अनुबंधांत प्रस्तुत अभ्यासांत एक अभिनव सूचना केली गेली आहे. ती म्हणजे ' गुंतवणुकीची तरतूद ' या मार्गाची. म्हणजे उद्योगधंद्याची स्थावर मालमत्ता असेल त्यावर एका ठराविक प्रमाणांत करमाफी द्यावयाची. उद्देश असा कीं या रूपांत जें भांडवल जमा होईल त्यांतून भांडवलधुपणी थांबवतां येईल. उद्योगधंद्यांना या धोक्यापासून वांचवण्याचा व त्यांच्या शिरावरील भांडवलकमतरतेची टांगती तरवार नष्ट करण्याचा हाच एक मार्ग आहे असें तज्ज्ञांचें मत आहे.

| | | |
|---|---|---|
| १२. वांटपाई नफा (१०–११) | १५.४३ | ८.६ |
| १३. डिव्हिडंडस् | ११.४७ | ६.३ |
| १४. अविभाजित नफा | ३.९६ | २.२ |

३ वट्ट नफ्याच्या वाटपाची सरासरी

| | कर | डिव्हिडंडस् | अविभाजित नफा |
|---|---|---|---|
| १९३७ ते ५१ सरासरी | ३८.५ | ४९.५ | १२.० |



अनुक्रमणिका
मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

**गी द मोपॉसाँ. अनु. प्रा. य. का. सोहनी**

# सुतळीचा तोडा !

गोदेव्हीलच्या भोंवतालचे रस्ते खेडूत व त्यांच्या बायका ह्यांनीं फुलून गेले होते. कारण तो बाजाराचा वार होता. पुरुष धिम्म्या पावलांनीं चालले होते. प्रत्येक पावलागणिक त्यांचे राकट शरीर पुढें ढकललें जाई. नांगरावर उजवा हात सतत धरल्यामुळें कांहींचा डावा खांदा उंचावला होता, तर कापणीचे वेळीं तोल सांभाळण्यासाठीं पाय रुंदवावे लागल्यामुळें कांहींना फेंगडें चालण्याची संवय जडली होती. अंगावर जाडजूड, अघळपघळ अंगरखा होता; गळ्याजवळ व मनगटापाशीं आवळ असल्यानें खालून हवा शिरून तो मध्यें फुगे.

कांहींजण आपली गाय व वासरूं दोरीला बांधून डुलत डुलत तर केव्हां मध्येंच – वासरांबरोबर उड्या मारीत चालत. गुरांच्या मागून जाणाऱ्या घरधनिणी हातांत नुकत्याच तोडलेल्या ( झाडांच्या ) फांद्यांचे हळुवार फटके जनावरांच्या पाठीवर मारीत होत्या.

त्यांच्या हातांतल्या टोपल्यांतून कोंबड्या व बदकें मध्येंच टोपलीबाहेर डोंकावून ( आपआपल्या भाषेंत ) एकमेकांना विचारीत : ' हा काय प्रकार आहे ? ' घरधन्यांपेक्षां घरधनिणींचीं पावलें झपझप पडत होतीं. वक्षःस्थलावर गांठ मारलेली अंगावरची शाल, डोक्यावर पांढरें फडकें व त्यांवर विराजमान झालेली टोपी, असा त्यांच्या वेष होता. मध्येंच खडखड आवाज करीत एखादा खटारा जाई. त्यांतल्या बांकड्यावर एकमेकांना बिलगून बसलेले दोन पुरुष तोल संभाळण्यासाठीं मध्यभागीं तळाशीं बसलेल्या बाईचा आधार घेत. या सर्व घोळक्यांत, बैलांची शिंगें व श्रीमन्त शेतकऱ्यांच्या उंच टोप्या उठून दिसत होत्या.

त्यांचा एकच गोंगाट चालला होता. आणि त्यांवर ताण करण्यासाठींच कीं काय एखादा भरदार छातीचा पेहेलवान गडी मधूनच मोठ्यानें ओरडे. मध्येंच नजीकच्या घरांतील गाय हें सर्व दृश्य पाहून हंबरडा फोडी. दुभत्या जनावरांचें मलमूत्र व शेतकऱ्यांचा घाम यांच्या मिश्रणांतून निघालेल्या उग्र दर्पानें हवा भरून गेली होती.

ब्रेओतेचा ओशकोर्न हा सुद्धां गोदेव्हीलच्या बाजाराला चालला होता. इतक्यांत रस्त्यांतल्या मातींत पडलेला एक सुतळीचा तुकडा त्याला दिसला. काटकसरीचं बाळकडू मिळाल्यामुळें सांपडेल ती बारीकसारीक वस्तूसुद्धां संग्रहीं ठेवण्याचा त्याला नाद होता. आपल्या संधिवाताच्या शरीराला कष्टानें वांकवीत त्यानें तो तुकडा उचलला. पण दुर्दैव त्याचें कीं त्याचवेळीं आपल्या दुकानांत उभा असलेला नाल मारणारा मालदँची व त्याची दृष्टादृष्ट झाली. दोघांचा पूर्वीचा हेवादावा असल्यानें अशी क्षुल्लक वस्तु उचलतांना आपण पाहिलं जावं याची ओशकोर्नला लाज वाटली. म्हणून त्यानें आपलं कांहींतरी हरवलें आहे व तें आपण शोधत असल्याचा त्यानें बहाणा केला. हळूंच चोरट्या हातानें त्यानें सुतळीचा तुकडा अंगरख्याच्या आंतल्या खिशांत ठेवला. ' हरवलेली वस्तु कांहीं सांपडत नाहीं. तेव्हां अधिक शोधण्यांत कशाला वेळ घालावा' अशा आविर्भावानें तो गोदेव्हीलच्या वाटेला लागला व आरडाओरड व गलका करणाऱ्या खेडुतांच्या जमावांत अदृश्य झाला.

गुरांच्या बाजारांत गाई व बैल यांच्या पाठीवर थाप मारीत कांहींजण त्यांची किंमत विचारीत होते. जनावराकडे ते निरखून पहात पुढें जात व पुन्हां कांहींसा विचार करून परत येत. एकदां ते विकणाऱ्याच्या नजरेंत कोठें लबाडी आहे काय म्हणून शोधीत, तर एकदां जनावरांत तर कांहीं दोष नाहींना म्हणून त्यांच्याकडे नजर फिरवीत.

बायकांनीं आपल्या टोपल्या पायापाशीं ठेविल्या व तंगड्या बांधलेलीं कोंबडीं-बदकें गिऱ्हाईकांना दाखवूं लागल्या. पाडून मागितलेला भाव लक्ष लावून त्या ऐकत पण आपली मनांतील किंमत न सोडतां निर्विकार, बेपर्वाई चेहऱ्यानें दुसरीकडे नजर लावीत.

" पांच फ्रँकला देणार ? ' गिऱ्हाईक पुन्हा विचारी.

" बऽरं ' — गिऱ्हाईकाचं मन मोडवत नाहीं असं दाखवीत विकणारी बाई संमति दर्शवी.

हलकें हलकें गर्दी घटूं लागली. दुपारचा बाराचा सुमार झाला. दूरच्या गांवांहून आलेल्यांनीं न्याहरीसाठीं उपाहारगृहाकडे धांव घेतली.

जुर्देंच्या हॉटेलांतील सर्व टेबलें गिऱ्हाइकांनीं भरून गेलीं. पुढच्या अंगणांत खटारे, एक्के, ढकलगाड्या यांची जणूं सभाच भरली. बैल चरायला सोडल्यामुळें,



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कांहीं गाडयां मागील बाजूला जमिनीला टेकल्या होत्या व पुढचा भाग आकाशाकडे दोन हात उंचावून – जणूं त्या परमेश्वराची आराधना करीत होत्या. कांहींचा पुढचा भाग जमिनीवर नाक घांसून देवाला आळवीत आहे असा भास होत होता. आंतील बाजूस शेकोटींतील प्रखर ज्वालांचा तांबूस प्रकाश कांहींच्या पाठीवर पडला होता. सळयांत अडकविलेल्या कोंबड्या, बदकें व बकऱ्या भाजून निघत होत्या व त्यांतून ठिबकणाऱ्या रसामुळें सर्वत्र घमघमाट सुटला होता. गिऱ्हाईकांच्या तोंडाला पाणी सुटलें नसतें तरच नवल !

सर्व सधन शेतकरी जुर्देच्या हॉटेलास आश्रय देत. जुर्दे हा सुद्धां एक गब्बर इसम होता. घोड्यांच्या व्यापारांत त्यानें बरीच माया जमविली होती.

पदार्थांच्या थाळया व 'सायडर'चे पेले भराभर रिकामे होत होते. खरेदीविक्रीच्या गप्पांना ऊत आला होता. कांहींजण पीक-पाण्यांवर चर्चा करीत होते. कांहींच्या मतें ती हवा भाजीपाल्याला उत्तम होती पण धान्याला मात्र अनिष्ट होती.

इतक्यांत पुढल्या अंगणांत दवंडी पिटली गेली. कांहीं बेफिकीर लोक सोडले तर बाकीचे सगळे उठून उभे राहिले. तोंडांतील घांस चघळत चघळत त्यांनीं खिडक्या व दारांकडे धांव घेतली.

दवंडीवाल्यानें आपल्या घोगऱ्या आवाजांत एकएक शब्दानंतर किंचित् काल थांबून बातमी देण्यास सुरवात केली :

" तमाम लोकांस कळविण्यांत येतें कीं, आज सकाळीं – बझव्हीलच्या रस्त्यावर – नऊ ते दहा वाजण्याच्या दरम्यान् – एक चामड्याचं पाकीट हरवलं आहे. त्या पाकिटांत पांचशें फ्रँकच्या नोटा व इतर कांहीं महत्त्वाचे दस्तऐवज होते. तरी ज्या कोणाला तें सांपडलं असेल त्यानें तें नगरपालिकेच्या कचेरींत अगर परस्पर मानव्हीलच्या उल्ब्रेकला आणून द्यावं –. आणून देणारास बक्षीस म्हणून रोख फ्रँक वीस देण्यांत येतील. "

दवंडीवाला दुसऱ्या ठिकाणीं गेला. तेथून पुन्हां त्याचा आवाज ( अर्थात् क्षीण ) लोकांच्या कानांवर अजून पडत होता. उल्ब्रेकच्या पाकिटाबद्दल लोकांत चर्चा सुरूं झाली. तें परत मिळण्याबद्दल किती शक्यता आहे यावर कित्येकांचा वादविवाद रंगला.

सुग्रास अन्नाबरोबर तोंडीं लावणं म्हणून पाकिटाचा विषय गिऱ्हाइकांना मिळाला व त्या नादांत त्यांचं जेवण केव्हांच आटोपलं ! – शेवटचं कॉफीपान चालूं असतां एक शिपाई दारांत येऊन थडकला.

" ब्रेओनेचा ओशकोर्न आहे का इथें ? " त्यानें पुकारलें.

" हाँ, हा पहा इथेंच आहे. " असं उत्तर करीत ओशकोर्न आपल्या कोपऱ्यांत उभा राहिला.

" तुम्ही जरा कचेरींत चलता का ? साहेबांचं तुमच्याशीं काम आहे. "

ओशकोर्नला विस्मय वाटला. त्याचं संधिवाताचं शरीर खाण्यानन्तर अधिकच सुस्तावलं होतं. मोठ्या कष्टानें तो चालूं लागला.

" माझ्याशीं काय काम आहे ? काय काम आहे माझ्याशीं ? " तोच प्रश्न उलटसुलट स्वतःला विचारीत, चिंतातुर नजरेनें शिपायाच्या मागून आपलीं पावलं टाकूं लागला.

" बझव्हीलच्या रस्त्यावर उल्ब्रेकचं पाकिट उचलतांना तुम्हाला एकानं पाहिलं." कचेरींत पोहोंचतांच साहेब त्याला म्हणाले.

आपल्यावर वहीम आला आहे याची तीव्र जाणीव होऊन ओशकोर्न वेड्यासारखा साहेबाच्या चेहऱ्याकडे पाहत राहिला.

" मी ... मी ... पाकीट – उचललं ? "

त्यानें चाचरत विचारलं.

" होय ! तूंच " साहेबाकडून जबाब दिला गेला.

"शपथेवर सांगतों, मला यांतलं कांहीं माहीत नाहीं."

" पण एकानं तुला नक्की पाहिलं. "

" मला पाहिलं ! कोणीं ? "

" नालवाला मालादँ. "

मग मात्र त्याच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला व तो रागानें लालबुंद होऊन ओरडला :

" त्या भिकारड्यानें ! हँ ! हा सुतळीचा तुकडा उचलतांना पाह्यलं मला ! हा पहा, साहेब ! "

असं म्हणत त्यानें आंतल्या खिशांत जपून ठेवलेला तो तुकडा बाहेर काढिला.

" झूट. तुला असं वाटतं काय कीं मालादँ सुतळीच्या तुकड्याला पाकिट समजेल इतका खुळा आहे ? " – संतापानें साहेबांच्या तोंडून धड शब्दहि उमटत नव्हते.

" मी देवाला स्मरून सांगतों कीं हा तुकडाच मी उचलला. मी जर खोटं बोलत असेन तर माझी जीभ झडून जाईल ! "



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## सुतळीचा तोडा !

"आणि पाकीट उचलल्यावर एखादी नोटबीट पडली नाहींना म्हणून तूं आणखीन् धुंडत सुद्धां राहिलास."

"कुभांड रचायला कांहीं मर्यादा नाहीं. एखाद्याची विनाकारण अब्रू घ्यायची म्हणजे काय! काय, अब्रू घ्यायाची म्हणजे काय!"

पण त्याच्यावर कोणाचा विश्वास बसेना.

मालाद्नें छातीला हात लावून सांगितलं कीं आपलं म्हणणं खरं आहे. दोघांची शिवीगाळ झाली. शेवटीं ओशकोर्नेची झडती घेण्यांत आली. परंतु पाकीट त्याच्याजवळ मिळालं नाहीं. नाइलाजानें त्याला सोडावं लागलं. पण पोलिसाची पाळत मात्र त्याच्यावर राहिली.

कचेरीबाहेर आल्यावर लोकांचा त्याच्याभोंवतीं गराडा पडला. प्रश्नांचा त्याच्यावर भडिमार झाला. त्यानें प्रत्येकाला सुतळीची हकीकत सांगितली. मात्र त्याच्यावर विश्वास कोणाचाच बसला नाहीं. सर्वजण कुचेष्टेनें हंसले.

येणारा-जाणाराला सग्या-सोबत्यांना सर्वांना त्यानें सुतळीची कथा निवेदन केली. आपण निष्कलंक आहोंत हें पटविण्यासाठीं सर्व खिसे सुद्धां उलटे करून दाखविले.

"बेरड आहे हं." लोक पुटपुटत.

तो रागानें लाल होऊन, अधिक आवेशानें आपली बाजू त्यांच्यापुढें मांडी.

दिवेलागणीची वेळ झाली. तो आपल्या तीन शेजाऱ्यांसह परत आपल्या गांवाकडे जायला निघाला. सुतळीचा तुकडा कुठें सांपडला तें ठिकाण त्यानें दाखविलें. वाटभर त्याची हीच बडबड चालू होती.

ब्रेओतेला पोंचल्यावर त्यानें गांवकऱ्यांना तो घडलेला प्रकार निवेदन केला. पण गांवकऱ्यांना सुद्धां त्याचं म्हणणं पटलं नाहीं.

रात्रभर त्याचा डोळ्याला डोळा लागला नाहीं.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं एक वाजतां त्याला समजलं कीं, पोमेलच्या नोकराला तें रस्त्यांत सांपडलं म्हणे. अन् त्यानें जसेंच्यातसें तें उल्ब्रेकच्या स्वाधीन केलें.

"तरी मी जीव तोडून सांगत होतों कीं मी कशाला तें उचलीन. सांपडलं कीं नाहीं आतां! उगाच एखाद्यावर आरोप करायचा म्हणजे काय!"–

ओशकोर्न विजयी मुद्रेनें ज्याला त्याला सांगूं लागला. रस्त्यानें जाणाऱ्यांच्या, गुत्त्यांत जमलेल्यांच्या व रविवारीं प्रार्थनेनंतर बाहेर पडणाऱ्यांच्या, सर्वांच्यापुढें त्यानें आपला पाढा वाचला.

आतां जरा त्याचं मन शांत झालं. पण कां कुणास ठाऊक, चिंतेची एक रेषा त्याच्या चेहऱ्यावर अजून होतीच. कारण, लोक त्याची हकिकत ऐकतांना मिस्किलपणें हंसत व एकमेकांना डोळ्यांनीं खुणावीत.

पुढच्या मंगळवारच्या बाजाराला तो मुद्दाम गेला. वाटेंत भेटलेला मालाद्ं त्याला पाहून कुचेष्टेनें हंसला. क्रिकतो शेतकऱ्याला त्यानें हटकलं. पण त्याचं म्हणणं पूर्ण ऐकून घेण्याच्या आंतच क्रिकतो त्याच्या पोटावर एक टिचकी मारीत उद्गारला: "अरे लबाडा, आम्हाला जसं कांहीं ठाऊकच नाहीं!"

तो आपल्याला लबाड म्हणाला हें ऐकून त्याला वाईट वाटलं. जुर्देच्या उपाहारगृहांत त्यानें पुन्हां आपली कथा निवेदन करायला सुरवात केली.

इतक्यांत मध्येंच अडवीत ब्रलोके त्याला म्हणाला,

"पुरे रे तुझी सुतळी!"

"पण, पाकीट मिळालंय ना?"

"सांपडलं आपल्याला अन् दिलं दुसऱ्याकरवीं. हे डाव आम्हाला कळत नाहींत होय?"

ओशकोर्नेची मति कुंठित झाली. लोकांच्या कुचेष्टेचा आतां त्याला अर्थ कळला.

आपण पूर्ण निर्दोषी असल्याचं त्यानें किती काकुळतीनं सांगितलं. पण हास्याचे फवारेच त्याला ऐकूं आले.

जेवण अर्धवट टाकूनच तो उठला. घरीं परतला तो त्याचे हातपाय थरथरत होते. लोकांना आपला निरपराधीपणा कसा पटवावा हेंच त्याला उमगेना. आधींच महाधूर्त म्हणून त्याची ख्याति असल्यामुळें कोणीच त्याची बाजू खरी मानी ना. आपलं म्हणणं पटवून देण्यासाठीं कोणत्या शब्दांत सांगावं, नवीन कोणते मुद्दे पुढें करावेत, याचाच तो रात्रंदिवस विचार करूं लागला.

पण त्याच्या वकिलीची कोणावरच छाप पडेना.

"आयुष्यांत एकदां तरी खरं बोल!" लोकांची त्याच्या कानांवर येई. त्याला कुजबुज धसका बसला. तो दिवसेंदिवस खंगत चालला. आतां लोक आपणहूनच त्याला 'सुतळीची गोष्ट' विचारीत.

डिसेंबरच्या शेवटीं त्यानें अंथरूण धरलं.

जानेवारीच्या पहिल्या आठवड्यांतच त्याचा आजार वाढला. वाताच्या शेवटच्या झटक्यांत तो बडबडतच होता: "अहो! हा सुतळीचा तुकडा पाहिलांत साहेब,! तुकडा–सुतळीचा!"

अन् त्यानें प्राण सोडला.









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. चिं. त्र्यं. केंघे

# 'अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञान

उत्कृष्ट काव्य आणि श्रेष्ठ तत्त्वज्ञान यांचा मनोहर संगम जसा उपनिषदांत बघावयास मिळतो तसाच तो ज्ञानेशांच्या ग्रन्थांतहि कांहींसा आधिक्यानेंच पाहण्यास सांपडतो. श्रीज्ञानेश्वरांच्या आज उपलब्ध असणाऱ्या ग्रन्थांत त्यांची ज्ञानेश्वरी या नांवानें ओळखली ज़ाणारी श्रीमद्भगवद्गीतेवरील टीकाच प्राधान्य पावली आहे. अध्यात्मतत्त्वज्ञान यथार्थ दृष्टान्त देऊन आपल्या काव्यमय रसाळ वाणीनें श्रीज्ञानेश्वरीच्या रूपांत ज्ञानदेवांनीं सामान्य जनांपर्यंत पोंचविलें. ज्ञानेश्वरीचा गाभाच असलेलें अद्वैततत्त्वज्ञान अधिकारी व्यक्तींकरितांच असलें तरी सामान्य व्यवहारी जनांनाहि ज्ञानेश्वरी आपलें जीवितसाफल्य साधण्यासाठीं मार्गदर्शक होईल. 'अमृतानुभवा'ची भूमिका मात्र याहून कांहींशी भिन्न आहे. 'अमृतानुभवा'ची योग्यता काव्य आणि तत्त्वज्ञान या दोन्हीं दृष्टींनीं इतर कोणत्याहि ग्रन्थापेक्षां कमी नसली, तरी त्यांत वर्णिलेल्या अनुभवामृताची गोडी आध्यात्मिक जीवन जगणारे अधिकारीच चाखूं शकतील. 'अमृतानुभवां'तील सारेंच विवेचन ज्ञानेशांनीं पारमार्थिक भूमिकेवरून केलें आहे, आणि म्हणून ही भूमिका न समजणाऱ्या पण्डितांनीं 'अमृतानुभवा'च्या तत्त्वज्ञानाविषयीं विविध मतें प्रकट केलीं आहेत. अलीकडे 'नवभारता'च्या ऑगस्ट १९५४ च्या अंकांत श्री. भा. पं. बहिरट यांनींहि 'अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञानासंबंधीं आपलें मत दिलें आहे. त्याचा विचार करावयाचा आहे.

### 'अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञान : विविध मतें

'अमृतानुभवा'वर आज उपलब्ध असणाऱ्या टीकांत शक १५५७ मध्यें श्रीशिवकल्याणस्वामींनीं रचिलेली 'नित्यानंददीपिका' या नांवाची ओवीबद्ध टीका प्राचीनतम आहे. याखेरीज इतरहि अनेक टीका या ग्रन्थावर लिहिल्या गेल्या आहेत, परंतु त्यांच्यांत ज्ञानेश्वर अद्वैत-वेदान्तीच होते याविषयीं मुळींच मतभेद आढळत नाहीं. सांप्रदायिक पद्धतीनें ज्ञानेश्वरांच्या ग्रन्थांचें अध्ययन न करणाऱ्या कांहीं आधुनिक अभ्यासकांनीं मात्र शंकराचार्यांच्या अद्वैतवेदान्ताहून 'अमृतानुभवा'चें आणि म्हणूनच ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान भिन्न आहे, हें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. पं. पांडुरंगशर्मा या मताचे कट्टे पुरस्कर्ते होत. ज्ञानेश्वर अद्वैत-वेदान्ती होते या रूढ समजुतीला १९२१ सालीं 'चित्रमयजगत्' या मासिकांत लेखमाला सुरूं करून त्यांनीं जोराचा धक्का दिला. विस्तृत वाचन आणि ओजस्वी भाषाशैली या त्यांच्या लेखांतील गुणांमुळें त्यांना अनुयायीहि पुष्कळच लाभले. ज्ञानेश्वरांचें तत्त्व-ज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाहून भिन्न आहे, इतकेंच नव्हे तर शंकराचार्यांच्या मायावादाचें ज्ञानेश्वरांनीं 'अमृतानुभवां'त खण्डन केलें आहे असें साधार दर्शविण्याचा त्यांनीं प्रयत्न केला.

यानंतर 'ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान' या सुप्रसिद्ध प्रबंधां-त प्रा. डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं ज्ञानेश्वर व इतर तत्त्ववेत्ते यांच्या तत्त्वज्ञानांचा तौलनिक विचार केला. या प्रबन्धांत पं. पांडुरंगशर्मा यांनीं दर्शविलेल्या सर्व आधारवचनांचा विचार करून ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाहून भिन्न नाहीं, असें त्यांनीं सिद्ध केलें. योगवासिष्ठ, गौडपादकारिका आणि शांकरभाष्य यांच्याशीं ज्ञानेश्वरांच्या ग्रंथांचें असलेलें साम्य त्यांनीं साधार दाखविलें, आणि 'अमृतानुभव' हें आपल्या ग्रंथास दिलेलें नांवहि ज्ञानदेवांना योगवासिष्ठांतील (६-१०-७१) "अनारतगलद्रूपं नित्यं च अनुभवामृतम् । अहं निःशेषचक्राणि चिद्ब्रह्माहमलेपकम् ॥" या श्लोकावरूनच सुचलें असावें हें निदर्शनास आणलें. त्याचप्रमाणें योगवासिष्ठावर ज्ञानेशांनीं लिहिलेल्या ग्रंथां-तील कांहीं भागच 'अनुभवामृत' वा 'अमृतानुभव' या नांवानें प्रसिद्ध झाला असावा हें आपलें मतहि त्यांनीं त्यांत नमूद करून ठेवलें आहे.

डॉ. शं. दा. पेंडसे यांच्या प्रमाणांचा साकल्यानें विचार करून त्यांना उत्तर देण्याचा प्रयत्न नंतर झाला नाहीं. प्रा. न. र. फाटक यांनीं 'ज्ञानेश्वर : वाङ्मय व कार्य' या पुस्तकांत 'अमृतानुभवा'चा विचार केला असला तरी अमृतानुभवाच्या तत्त्वज्ञानाविषयीं आपलें ठाम मत ते मांडूं शकले नाहींत. श्री. भा. पं. बहिरट यांनीं ''अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञान' ('नवभारत' ऑगस्ट १९५४) या लेखांत 'अमृता-नुभवा'च्या तत्त्वज्ञानाला प्राधान्य देऊन ज्ञानेशांचें



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाहून भिन्न आहे असें आपलें मत प्रतिपादिलें आहे. पं. शर्मांच्या 'अमृतानुभवां'तील आधारांचा आणि श्री. बहिरट यांच्या लेखांतील आधारांचा विचार करून 'अमृतानुभवा'चें तत्त्वज्ञान अद्वैतवेदान्ताशीं मुळींच विसंगत नाहीं हें प्रस्तुत लेखांत दाखवावयाचें आहे.

प्रारंभींच सांगितल्याप्रमाणें आध्यात्मिक साधकाला निकराचा आत्मभाव प्राप्त होत असतां येणारा अनुभव ज्ञानेश्वरांनीं 'अमृतानुभवां'त व्यक्त केला आहे. जगाची उत्पत्ति कशी झाली? जीव अविद्येच्या भोंवऱ्यांत कसा सांपडला? जीवाला सांसारिक दुःख कसें प्राप्त होतें आणि त्यापासून मुक्त होण्याचा उपाय कोणता? इत्यादि तत्त्वज्ञानांत आवश्यक म्हणून मानलेल्या प्रश्नांचा विचार 'अमृतानुभवां'त ज्ञानराजांनीं मुळींच केलेला नाहीं; कारण तो 'अमृतानुभव' लिहिण्याचा हेतुच नाहीं! या सर्व प्रश्नांचा विचार ज्ञानेश्वरींत आला आहे; म्हणूनच ज्ञानेश्वरांचें समग्र तत्त्वज्ञान 'अमृतानुभवां'तच बघावयास मिळतें हें मत खरें नव्हे. याहिपुढें जाऊन, ज्ञानेश्वरींत व्यासांचा अभिप्राय ज्ञानेशांनीं स्पष्ट केला असल्यानें तेथें त्यांचें खरें तत्त्वज्ञान व्यक्त झालेलें नाहीं, हें पं. पांडुरंगशर्मा-आदींचें मत आहे. असें असेल तर प्रारंभापासून अखेरपर्यंत 'संसार जिणें तें शस्त्र' आणि 'मोक्षरानीं स्वतंत्र' म्हणून ज्ञानराजांनीं ज्ञानेश्वरींत गीतेची केलेली स्तुति हें सारें ढोंगच म्हणावयाचें? तें त्यांचें स्वमत नाहीं तर!

अर्थात् वरील विवेचनाचा हेतु 'अमृतानुभवा'ची थोरवी नाकारण्याचा नाहीं. 'अमृतानुभवा'ची योग्यता निःसंशय फार मोठी आहे. परंतु 'अमृतानुभव' वाचल्यावांचून ज्ञानेशांचें इतर वाङ्मय समजूं शकणार नाहीं हें श्री. बहिरटांचें म्हणणें बरोबर नाहीं. सागर फार थोर, त्यांत पोहण्यांत मोठा आनन्द, पण म्हणून पोहण्यास शिकूं इच्छिणाऱ्यानें प्रारंभींच सागरांत उडी टाकावी कीं काय! तीच स्थिति साधकांच्या दृष्टीनें 'अमृतानुभवा'ची आहे. ज्ञानेश्वरीचें रहस्य समजल्यावांचून 'अमृतानुभवा'चें आकलन होणार नाहीं. "'ज्ञानेश्वरीं'त ज्ञानेशांनीं कित्येक ठिकाणीं अज्ञान अगर माया हिचें वर्णन केल्यामुळें ते मायावाद स्वीकारतात असा गैरसमज होतो" असें श्री. बहिरटांना वाटतें. ज्ञानेश्वरींत सांगितलेला मायावाद वेदान्त्यांच मत म्हणून सांगितला आहे हा श्री. बहिरटांचा गैरसमजच म्हणावा लागेल. वेदान्तालाच 'महारसु मोदकु' म्हणणारे ज्ञानेश वेदान्ती नव्हते असें कसें म्हणतां येईल? ज्ञानेश्वरींत वेदान्ताचा उल्लेखहि न करतां जेथें मायावाद सांगितला आहे अशीं स्थळेंहि थोडीं नाहींत.

## शंकराचार्यांचा मायावाद

शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचें यथार्थ आकलन न झाल्यामुळेंच ज्ञानेश्वरांच्या अभ्यासकांचा, ज्ञानदेवांचा चिद्विलासवाद शंकराचार्यांच्या मायावादाहून भिन्न आहे, असा गैरसमज झाला आहे. शंकराचार्य माया वा अज्ञान स्वतंत्र वस्तु मानतात असें गृहीत धरून, ज्ञानेशांनीं अज्ञानाचें खण्डन केलें असल्यानें त्यांचें तत्त्वज्ञान शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाहून भिन्न आहे, असें हे अभ्यासक प्रतिपादितात. वास्तविक माया अशी स्वतंत्र वस्तु मानल्यास अद्वैत सिद्धच होऊं शकणार नाहीं. दृश्य भेदयुक्त जगाची उत्पत्ति कशी झाली याचें स्पष्टीकरण देण्यासाठींच अठराव्या हत्तीप्रमाणें शंकराचार्य माया आणतात. आत्मबोध होण्यापूर्वी माया नि तज्जन्य द्वैत सत्य वाटलें तरी आत्मबोधानंतर मायेचें अस्तित्व केव्हांच नव्हतें असा प्रत्यय येतो. म्हणूनच तर्कशुद्ध बोलावयाचें झाल्यास माया 'सदसदनिर्वचनीय' आहे असेंच म्हणावें लागतें. मायेचें हें त्रिविध स्वरूप विद्यारण्यस्वामींनीं 'पञ्चदशीं'तील पुढील श्लोकांत चांगल्या रीतीनें स्पष्ट केलें आहे

'तुच्छाऽनिर्वचनीया च वास्तवी चेति सा त्रिधा ।
ज्ञेया माया त्रिभिर्बोधैः श्रौतयौक्तिकलौकिकैः ॥'

ज्ञानदेवांनींहि या तिन्ही दृष्टींनीं मायेचें विवेचन केलें आहे. 'ज्ञानेश्वरींत' या तिन्ही प्रकारांनीं मायेचें विवेचन आलें आहे तर 'अमृतानुभवां'त प्राधान्यानें मायेचें तुच्छत्वच दर्शविलें आहे; कारण 'अमृतानुभव' पारमार्थिक भूमिकेनेंच लिहिला आहे. पारमार्थिक भूमिकेवरून शंकराचार्यहि मायेचें अस्तित्व मान्य करीत नाहींत म्हणूनच पं. शर्मांना वाटतें त्याप्रमाणें रामानुजाचार्यांच्या भूमिकेवरून 'अमृतानुभवां'त अविद्याखण्डन केलें नसून, ज्ञानेशांचें अज्ञानखण्डन हें शंकराचार्यांच्या भूमिकेवरून रामानुजाचार्यांच्या अविद्याखण्डनास उत्तर आहे असेंच म्हणतां येईल. अर्थात्



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कोणत्याहि मताचें खण्डन करण्यासाठींच 'अमृतानुभव' लिहिलेला नाहीं. ज्ञानेश्वरीइतकाच 'अमृतानुभव'हि उत्स्फूर्त आहे. परमेश्वरानें सूर्याला दिलेलें तेज जसें त्याच्याचसाठीं नसून साऱ्या विश्वाला प्रकाशित करण्यासाठीं आहे तसेंच गुरुकृपेनें मिळालेला अनुभव साऱ्या विश्वासाठीं आहे असें ज्ञानेशांना वाटतें :

परी गा श्रीनिवृत्तिराया। हातातळीं सुखविलें तुया।
तरी निवांतचि मिया। भोगावें कीं तें ॥
(अ०- १०–१)

परी महेशें सूर्याहातीं। दिधली तेजाची सुती।
तया भासा अंतर्वर्ती। जगचि केलें॥ (अ० १०–२)
म्हणोनि हें असंवर्य। हें देवकीचें औदार्य।
वांचोनि स्वातंतर्य। माझें नाहीं ॥ (अ० १०–६)

'अमृतानुभवा'ची ही पारमार्थिक भूमिका बरोबर ओळखून 'अमृतानुभवा'च्या तत्त्वज्ञानाचा विचार केल्यास तें अद्वैतवेदान्ताहून वेगळें नाहीं असा विश्वास पटेल.

## जगत् सत्य कीं मिथ्या ?

श्रीशंकराचार्यांनीं 'जगन्मिथ्या' हा सिद्धान्त मांडला तर ज्ञानेशांच्या मतें जगत् आत्म्याचाच विलास असल्यानें सत्यच आहे असें पं. शर्मा, बहिरटप्रभृति अभ्यासकांना वाटतें. वास्तविक ज्ञानेश्वरींत शेंकडों ठिकाणीं जगत् आभास असल्याचा ज्ञानेशांनीं निर्वाळा दिला आहे. परंतु

"म्हणोनि जग असिकी। वस्तुप्रभा ॥
(अ० ७ – २८९)

यालागीं वस्तुप्रभा। वस्तूचि पावे शोभा।
जातसे लाभा। वस्तुसिचि ॥ (अ० ७–२९१)
वांचुन वस्तु इया। आपणापे प्रकाशावया।
अज्ञान हेतु वाया। अवघेचि॥ (अ० ७–२९२)"

या उताऱ्यांतील 'असिकी' या शब्दावर भर देऊन ज्ञानेश्वरींत ज्ञानेशांनीं स्वमत प्रतिपादिलेलें नाहीं असें या अभ्यासकांनीं ठरविलें आहे. उपर्युक्त ओव्यांची सविस्तर अर्थचर्चा डॉ. शं. दा. पेंडसे यांनीं केलीच आहे ('श्रीज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान', पृष्ठ २८४ ते २८६). 'असिकी' या शब्दानें भेदयुक्त जगत् सत्य आहे असें सांगावयाचें नसून तें ब्रह्मस्वरूपच आहे हें दाखवावयाचें आहे. शंकराचार्यहि 'ब्रह्मव्यतिरेकेण जगतोऽभावः' ('ब्रह्मावेगळें जगाला अस्तित्व नाहीं') असेंच सांगतात. जगत् ब्रह्मस्वरूप आहे हा सिद्धान्त शंकराचार्यांनाहि पूर्णपणें संमत आहे. श्री. बहिरट म्हणतात त्याप्रमाणें 'आत्मा हा नानारूपानें विकसित झाला तरी त्याची एकरूपता भंगत नाहीं.' परंतु ही एकरूपता भंगत नाहीं कशी ? – याचें तर्कशुद्ध स्पष्टीकरण देण्यासाठींच मायेची कल्पना आणावी लागते. चेतन आणि अचेतन, शुद्ध आणि अशुद्ध, अशा हजारों प्रकारचे भेद प्रत्यक्ष दिसत असतां अद्वैतच सत्य आहे हें अन्यथा बुद्धीला पटण्यासारखें नाहीं. भेदाची उपपत्ति लावल्यानंतर अद्वैताच्या पारमार्थिक भूमिकेवरून मायेचें अस्तित्व मान्य करण्यास शंकराचार्यहि तयार नाहींत. 'जगन्मिथ्या' या शंकराचार्यांच्या उक्तीचा अभिप्राय योग्य प्रकारें लक्षांत घेतल्यास या दोन थोर तत्त्वज्ञांच्या तत्त्वज्ञानांतील अभेद स्पष्ट होईल.

आश्चर्य असें कीं ज्ञानेश्वरांची श्रेष्ठता सिद्ध करण्यासाठींच ज्ञानेश्वर आणि शंकराचार्य यांच्या तत्त्वज्ञानांत भेद आहे असें अभिनिवेशानें सांगितलें जातें. ज्ञानेश्वरांचें तत्त्वज्ञान स्वतंत्र नाहीं असें मानण्यांत ज्ञानदेवांना कमीपणा आहे असें त्यांना वाटतें. वास्तविक हजारों वर्षें कित्येक विचारवंतांनीं मिळविलेल्या अनुभवाचा विचार न करतां स्वतंत्रपणें कांहींहि सांगण्यांत मोठेपणा तो कोणता ? मागील पिढ्यांनीं परिश्रमपूर्वक जतन केलेल्या अनुभवसांठ्याचा मानव उपयोग करून घेऊं शकतो. म्हणूनच तर इतर प्राण्यांहून तो श्रेष्ठ ठरला. श्रीशंकराचार्यांनींहि सर्वस्वीं स्वतंत्र तत्त्वज्ञान सांगितलें हें म्हणणें सयुक्तिक नाहीं. उपनिषदांतील तत्त्वज्ञान उपपत्तिपूर्वक सांगून त्यांनीं वैदिक दर्शनांचा समन्वय साधला आणि बौद्धदर्शनांतील ग्राह्य भाग स्वीकारून उपनिषदांना विरुद्ध असलेल्या अनात्मवादाची व्यर्थता दाखविली, यांतच त्यांचें थोरपण. ज्ञानेशांनींहि बहुजनसमाजापर्यंत हें लोण पोंचविलें आणि अद्वयानंदभांडाराचीं द्वारें सर्वांसाठीं खुलीं केलीं. 'मराठीचिये नगरीं' त्यांनीं 'ब्रह्मविद्येचा सुकाळ' केला यांत त्यांचें मोठेपण ! म्हणूनच एकाला श्रेष्ठ नि दुसऱ्याला कनिष्ठ ठरविण्याचा आग्रह काढून टाकल्यास 'अमृतानुभवा'च्या तत्त्वज्ञानाविषयीं खुली चर्चा करणें सुकर होईल.



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

श्री. सरोजिनी शारंगपाणि

# इच्छाशक्ति आणि तिचें कार्यक्षेत्र

प्राचीन पुराणग्रंथांतून ऋषिमुनींनीं दिलेल्या शाप-उःशाप आणि वर यांच्या योगानें व्यक्तींच्या किंवा साम्राज्यांच्या अनेक उलथापालथी होऊन असंभाव्य गोष्टी घडून आल्याचें आपण वाचतों आणि अशा गोष्टी केवळ लोकांच्या आत्यंतिक अज्ञानामुळें आणि लोकभ्रमामुळें विश्वासार्ह समजल्या जातात असें आपण समजतों. परंतु हल्लींचे शास्त्रज्ञ अनेक गोष्टींविषयीं छातींठोकपणें जीं असंभाव्य विधानें करतात तीं पाहिलीं म्हणजे बर्नार्ड शॉप्रमाणें शास्त्र म्हणजे हल्लींचा लोकभ्रम ('Science is modern superstition') असें म्हणावेंसें वाटतें. आधुनिक मानसशास्त्रज्ञ आणि प्रत्येक शारीरिक रोगाला मानसिक कारणें आहेत असें समजून मोहनीविद्यादि प्रयोगांनीं ते बरे करणारे मनोविश्लेषणतज्ज्ञ यांचीं इच्छाशक्तीच्या सामर्थ्याबद्दलचीं विधानें पाहिलीं म्हणजे मनुष्याची इच्छाशक्ति म्हणजेच ईश्वर तर नसेल अशी शंका येऊं लागते आणि साऱ्या विश्वाची उलथापालथ करण्याचें सामर्थ्य ज्या इच्छाशक्तींत आहे तिचें वास्तविक स्वरूप तरी कसें आहे आणि ती प्रबल कशी करतां येईल—असे अनेक प्रश्न मनांत उद्भवतात.

## उत्क्रान्तींत इच्छाशक्तीचें कार्य

मानवजातीच्या उत्पत्तीबद्दल उत्क्रान्तीचा सिद्धान्त मांडून डार्विननें त्यावेळच्या जगांत मोठी खळबळ उडविली आणि अमीबा नांवाच्या एकपेशी प्राण्यापासून प्राण्याच्या ज्या अनेक जाती निर्माण झाल्या त्या केवळ योगायोगानें पडत गेलेल्या फरकामुळें असें म्हणून दैववादाला पुष्टि दिली. परंतु हें त्याचें म्हणणें मान्य न झाल्यानें लामार्कनें इच्छाशक्तीवर भर देऊन डार्विनचा उत्क्रान्तिवाद थोड्या फरकानें पुन्हा मांडला आणि तो सर्वमान्य झाला. एकपेशी जीवापासून ज्ञानासाठीं अव्याहत धडपडणाऱ्या मानवापर्यंत ज्या तत्त्वामुळें प्रगति झाली त्या तत्त्वाचें म्हणजेच इच्छाशक्तीचें सामर्थ्य अतुलनीय असलें पाहिजे असें समजण्यांत येऊं लागलें. मानवी जीवनांतील प्रत्येक गोष्ट इच्छाशक्तीच्या जोरावरच घडून येते, आणि इच्छा असेल तेथें मार्ग आहे हें जरी ठोकळ मानानें खरें असलें तरी ईश्वराप्रमाणें इच्छाशक्तीच्या अंगीं 'कर्तुमकर्तुम्' शक्ति आहे असें खात्रीपूर्वक सांगता येणार नाहीं. लामार्कच्या तत्त्वाचा पुरस्कार करणारे अनेक मानसशास्त्रज्ञ आणि विचारवंत होऊन गेले; त्यांत बर्नार्ड शॉ यांचें नांव प्रामुख्यानें घेतां येईल. उत्क्रांतीमध्यें इच्छाशक्तीच्या कार्याचा भाग फार मोठा आहे असें म्हणून लामार्कनें आधुनिक शास्त्रीय विचारांत मोठी महत्त्वाची भर घातली असली तरी बर्नार्ड शॉ यांचीं, "मृत्यु म्हणजे मानवानें आपणास लावून घेतलेली एक संवय आहे, मृत्यूला इच्छाशक्तीच्या जोरावर जिंकता येईल व आपलें आयुष्य आपणाला वाटेल तितकें वाढवितां येईल"—हीं विधानें शास्त्रीय सत्यें म्हणून स्वीकारलीं जातील असें वाटत नाहीं. इतकेंच काय, पण रोजच्या व्यवहारांतील कित्येक गोष्टींकडे आपण ओझरती जरी नजर टाकली तरी वरील विधानें बर्नार्ड शॉ यांच्या लेखणींतून उतरलीं असलीं तरी त्यांत धडधडीत असत्य गोष्टींना शास्त्रीय मुलामा दिला आहे असेंच वाटतें. बर्नार्ड शॉ म्हणतात त्याप्रमाणें जर इच्छाशक्तीचें सामर्थ्य असेल तर जगांत प्रत्यहीं दिसणारे जे अत्यंत दरिद्री, दीन पंगु लोक त्यांना ह्या इच्छाशक्तीच्या जोरावर आपलीं दुःखें कां नष्ट करतां येत नाहींत? ह्या प्रश्नाला बर्नार्ड शॉ यांचें असें उत्तर आहे कीं, ह्या लोकांची इच्छाशक्ति तितकी प्रबळ नसते. पण ह्या उत्तरानें बर्नार्ड शॉ अगदीं अजाण अशा लहान बालकाचेंहि समाधान करूं शकणार नाहींत. नवसाला हमखास पावणाऱ्या देवाला नवस करूनहि आपली इच्छित गोष्ट साध्य न झाली तर नवस करणाराची देवावर श्रद्धा नाहीं म्हणून तसें झालें असें म्हणण्यासारखेंच हें आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकासः महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## शास्त्रज्ञांचे प्रयोग

एखादी गोष्ट घडून येण्यास अनेक कारणें असतात. त्यापैकीं ज्ञात अशीं सर्व कारणें घडलीं तरीहि जेव्हां ती गोष्ट घडून येत नाहीं तेव्हां त्या गोष्टीला आणखी-हि कांहीं कारणें असावीत असा तर्क करण्यांत येतो आणि त्यातलें एखादें अज्ञात कारण समजलें कीं, त्यामुळेंच ती गोष्ट घडून आली असें समजण्याचा आपला कल असतो. (Post hoc urgo propter hoc). मनुष्याच्या जीवनांत घडणाऱ्या गोष्टींना जीं अनेक कारणें आहेत त्यांपैकीं इच्छाशक्ति हें एक कारण आहे हें निर्विवाद आहे. पण तें एकमेव कारण नाहीं, आणि इतर कारणांच्या मानानें इच्छाशक्तीचें सामर्थ्यहि अगदीं अल्प आहे. ह्या बाबतींत प्रसिद्ध मानसशास्त्रज्ञ वाइजमन आणि मॅकडुगल यांनीं, संपादित स्वभाव-विशेष आनुवंशिकतेच्या नियमांनीं पुढील पिढ्यांतून उतरतात कीं नाहीं, हें ठरविण्याकरितां केलेल्या दोन प्रयोगांचा विचार येथें करणें जरूर आहे. वाइजमन यांनीं कांहीं उंदरांच्या शेपट्या पिढ्यान्‌पिढ्या छाटून टाकण्याचा क्रम ठेवला तरी त्यांना बिनशेपटीचे उंदीर निर्माण करतां आले नाहींत. कारण शेपटी नाहींशी करण्याची प्रबळ इच्छा उंदरांच्या मनांत निर्माण झाली नाहीं, असें शास्त्रज्ञांचें मत आहे. वाइज्‌मन यांच्या या प्रयोगावर टीका करतांना बर्नार्ड शॉनीं जे औपरोधिक आणि खोचक शब्द वापरले आहेत ते असे : "उंदरांच्या शेपट्यावर हल्ला करून त्या शहाण्या-(wise-man) नें आनुवंशिकतेचा नियम सिद्ध करण्याचा यत्न केला !" यानंतर मॅकडुगल यांनीं उंदरांना एका पसरट भांड्यांत सोडून, त्यांत पाणी भरावयाचें आणि पाण्यांतून बाहेर पडण्याचे मार्ग त्यांत दोन शिड्या ठेवून राखावयाचे आणि त्यांतील एका शिडीवर उंदीर चढूं लागले कीं त्यांना विजेचा झटका द्यावयाचा व उंदरांना सुटकेचा मार्ग फक्त एकच ठेवावयाचा, असा प्रयोग केला आणि तो यशस्वी झाला. आणि बऱ्याच पिढ्यांनंतर जन्माला आलेले उंदीर विद्युत्प्रवाहयुक्त शिडीकडे अनुभवाशिवायहि मुळींच जाईनासे झाले. यामुळें प्राण्यांच्या ठिकाणीं असलेल्या स्वसंरक्षणाच्या नैसर्गिक प्रवृत्तीमुळें विद्युत्-प्रवाहयुक्त शिडी टाळण्याची जबरदस्त इच्छा उंदरांच्यामध्यें निर्माण झाली आणि हा संपादित स्वभाव-विशेष उंदरांच्या पुढील पिढ्यांतूनहि दिसून येऊं लागला. हा प्रयोग यशस्वी झाल्यानें मॅकडुगलचा लौकिक अधिकच वाढला आणि वाइज्‌मनसारख्या थोर मानसवेत्त्याला कठोर टीकाप्रहार सहन करावे लागले. परंतु थोडा विचार केला असतां वाइज्‌मन आणि मॅकडुगल यांनीं ज्या तत्त्वावर आपले प्रयोग आधारले होते ती पद्धति एकच होती असें म्हणावें लागेल. कारण दुःखद अनुभवाची तीव्रता वारंवार जाणवल्या-शिवाय स्मृतिरेखा दृढ होत नाहीं आणि असे अनुभव पिढ्यानुपिढ्या आल्यावरच त्यांमुळें मनोरचनेंत पड-लेला बदल कायम स्वरूपाचा होऊन तो आनुवंशिक स्वभावविशेष बनतो. वाइज्‌मनच्या उंदरांना शेपट्या तोडल्याचें दुःख जन्मांतून एकदाच सहन करावें लागलें आणि म्हणूनच कित्येक पिढ्यांनंतरहि त्याची तीव्रता पुरेशी न जाणवल्यामुळें बिनशेपट्यांचे उंदीर तयार झाले नाहींत. याच्या उलट, मॅकडुगलच्या उंदरांना वार-वार म्हणजे दिवसांतून दोनतीनवेळांसुद्धां विजेचा झटका सहन करावा लागल्यामुळें हळूं हळूं त्यांच्या मनोरचनेंत पडलेला फरक आनुवंशिक होऊं शकला. वाइज्‌मनच्या उंदरापासूनहि अशाच तऱ्हेनें बिनशेपटीचे उंदीर तयार होणें अशक्य नव्हतें. परंतु त्याला उंदरांच्या लक्षावधी पिढ्यांवर प्रयोग करावा लागला असता. म्हणजे वाइज्‌मनची चूक झाली ती हा कालावधि लक्षांत न घेतल्यामुळें झाली. ह्यावरून असें लक्षांत येईल कीं प्राण्याच्या शरीररचनेंत किंवा मनोरचनेंत लक्षांत येण्या-सारखा फरक घडवून आणण्यास कित्येक व्यक्तींची पिढ्यानुपिढ्यांची इच्छाशक्ति खर्च करावी लागेल. इच्छाशक्तीचें सामर्थ्य इतकें अल्प आहे.

## क्रियाशील इच्छाशक्ति

वासना आणि अभिलाष (animal wants and desires) ह्यांपेक्षां इच्छाशक्ति अगदी वेगळी आहे. दुसऱ्याचें सुंदर गुटगुटीत बालक एखाद्या निपु-त्रिकानें पाहिलें आणि तसें एखादें मूल आपणाला असावें असें त्याला वाटलें तर ती इच्छा नव्हे, ती वासना. तसेंच ऐष-आरामांत रहाणाऱ्या एखाद्या लक्षाधी-शाला पाहून संपत्तीचा मोह वाटणें म्हणजे इच्छा नव्हे, तो अभिलाष. इच्छाशक्ति ही कधीं निष्क्रिय असत नाहीं, कारण सक्रिय शील म्हणजेच इच्छा. (Character in action is will). परंतु



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हें शील म्हणजे सुद्धां सर्व किंवा बऱ्याच नैसर्गिक प्रवृत्ती एकत्र आल्यानें होत नाहीं. नैसर्गिक प्रवृत्तींचा बाह्य जगांतील वस्तूंशीं संबंध येऊन ज्या बऱ्यावाईट भावना निर्माण होतात त्याचा व्यक्तीच्या मनांत श्रेष्ठ-कनिष्ठ दर्जा ठरून भावनांची जी विशिष्ट रचना केली जाते तें त्या व्यक्तीचें शील (character). कोणतीहि नैसर्गिक प्रवृत्ति स्वतंत्रपणें मनुष्याच्या वर्तनांत आपला प्रभाव गाजवूं शकत नाहीं, तर ह्या नैसर्गिक प्रवृत्तींची मनुष्याच्या मनांत अशी गुंफण झालेली असते कीं, शील हें ह्या अनेकविध प्रवृत्तींचें बनलें आहे असें ओळखणेंहि कठीण जाईल. शीलाचें काम वर्तनमार्ग आंखण्याचें. परंतु तें सक्रिय झालें, कृतींत उतरलें म्हणजे ती इच्छाशक्ति. ॲड्लरनें 'व्यक्तीची प्रवृत्ति आणि समाजाचें मत ह्या एका चौकोनाच्या जवळच्या दोन बाजू समजल्या तर त्या चौकोनाचा कर्ण म्हणजेच व्यक्तीचें शील', अशी शीलाची व्याख्या केली आहे. आणि हा वर्तनमार्ग कृतींत आला म्हणजे ती इच्छा.

इच्छाशक्ति निष्क्रिय असत नाहीं हें आपण पाहिलेंच. एखाद्या गोष्टीबद्दल मनांत अभिलाषा उत्पन्न झाली कीं, ती कितपत साध्य आहे हें ठरवून ती साध्य करण्याचा निश्चित मार्ग ठरविणें म्हणजे इच्छाशक्ति निर्माण करणें आणि अशा ठरविलेल्या ध्येयाकरितां अव्याहत अविश्रांत श्रम करणें आणि ध्येयप्राप्तीकरितां येईल त्या संकटांना तोंड देणें म्हणजे इच्छाशक्ति प्रबल करणें. यशस्वी झालेल्या व्यक्तीच्या प्रबल इच्छाशक्तीचे गोडवे गायचे आणि अयशस्वी झालेल्यांच्या इच्छाशक्ती निर्बल म्हणून त्यांची हेटाळणी करायची हा मार्ग जरी सोपा असला तरी न्याय्य खास नाहीं हें विचारवंतांनाहि पटलेलें आहे. म्हणून, नीतिशास्त्रांत इच्छाशक्ति स्वतंत्र आहे काय ह्या प्रश्नावर इतका काथ्याकूट करूनहि निर्णायक उत्तर अजून नीतिशास्त्रज्ञांना देतां आलेलें नाहीं. कित्येकांनीं उघडउघड दैववादाचा पुरस्कार केला आहे. परंतु जर मनुष्याची इच्छाशक्ति स्वतंत्र नसेल तर त्यानें केलेल्या पापांना आणि दुष्कृत्यांना त्याला जबाबदार धरतां येणार नाहीं आणि अशा कृत्यांबद्दल त्याला शासनहि करतां येणार नाहीं. समाजांत गुन्हेगारांना शिक्षा करणें जर आवश्यक असेल तर गुन्ह्याची जबाबदारी त्यांच्यावर लादलीच पाहिजे अशा पेंचप्रसंगांत पडल्यामुळें, इच्छाशक्ति स्वतंत्र आहे परंतु ती समाजाचें कल्याण आणि व्यक्तीचें कल्याण साधणाऱ्या सन्मार्गानें जाण्यापुरतीच स्वतंत्र आहे, ती समाजविरोधी असूं शकत नाहीं, अशी तिच्या स्वातंत्र्याची व्याख्या केली आहे.

## प्रतिक्षिप्त क्रिया

मनुष्याच्या प्रत्येक कृतीला इच्छाशक्तीचें अधिष्ठान असलेंच पाहिजे. जाणतेपणीं (consciously) केलेल्या प्रत्येक कृतीला इच्छाशक्तीचें अधिष्ठान असलें पाहिजे. कारण एखाद्या प्रसंगीं एखाद्या व्यक्तीशीं कसें वागावयाचें हें त्या प्रसंगीं त्या व्यक्तीविषयीं उत्पन्न होणाऱ्या भावनांच्या कमीअधिक तीव्रतेवर अवलंबून राहील. वर्तनमार्ग एकदा आंखल्यावर मनुष्य तो कृतींत आणतो. ह्याहिपुढें जाऊन सहजासहजीं होणाऱ्या प्रतिक्षिप्त ( reflex actions ) क्रियासुद्धां इच्छाशक्तीमुळेंच होतात असें आपलें मत लॉट्झ आणि वुंट ह्या मानसशास्त्रज्ञांनीं मांडून बऱ्याच प्रयोगांनीं तें सिद्ध करण्याचाहि यत्न केलेला आहे. रोजच्या व्यवहारांतील कित्येक गोष्टी विचारपूर्वक करण्याची जरूरी नसल्यानें आपण त्या विशिष्ट पद्धतीनें करावयाचें ठरवून त्या पद्धतीनें त्या करण्याची आपण संवय लावून घेतों आणि इतर महत्त्वाच्या गोष्टींकडे लक्ष देण्यास मेंदूस सवड करून देतों, तसेंच या प्रतिक्षिप्त-क्रियांचें सुद्धां आहे. डोळ्याजवळ एकदम एखादी वस्तू धरल्यास किंवा त्यावर प्रकाश पाडल्यास त्याची उघडझांप होते. ह्या क्रिया पूर्वीं इच्छाशक्तीशिवाय होत नसाव्यात परंतु वारंवार आलेल्या पिढ्यानुपिढ्यांच्या अनुभवानें ह्या क्रिया प्रतिक्षिप्त क्रिया बनल्या आहेत. एखादा सैनिक रस्त्यानें चालला असतां "हाल्ट" असा शब्द त्याला ऐकूं आला तर आपण परेड करीत नाहीं हें माहीत असूनहि तो चटकन् थांबतो, ही त्याची **विशिष्ट प्रतिक्षिप्त क्रिया** (conditioned reflex) होय. ह्या प्रतिक्षिप्त क्रिया प्रयत्नानें इच्छाशक्तीच्या ताब्यांत आणतां येतात आणि रोजच्या व्यवहारांतील कित्येक गोष्टी वारंवार घडल्यानें प्रतिक्षिप्त क्रिया बनतात हें लॉट्झ आणि वुंट ह्यांनीं दाखवून दिलेलें आहे. जेम्स आणि लॅंज यांनीं एखादी कृति करण्यास लागणाऱ्या चालना, आकलन आणि भावना यांपैकीं आधीं कोणती, हा वाद



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सुरू केला. त्यांतहि जेम्स आणि लँज यांच्या म्हणण्या-प्रमाणें आधी कृति आणि मग आकलन आणि भावना असें नसून आधीं आकलन नंतर भावना आणि मग इच्छाशक्ति तयार झाल्यावर कृति, असें सिद्ध झालें आहे. सायको-गॅल्व्हॅनोमीटरच्या साहाय्यानें केलेल्या प्रयोगावरूनहि भावनांचा उदय आधीं होतो असेंच दिसून आलें आहे. यावरून मनुष्य यंत्राप्रमाणें विचार-शून्य कृति करीत नसून भावनांनीं वर्तनमार्ग आंखल्यानंतर इच्छाशक्तीच्या जोरावर कृति करतो हेंच सिद्ध होतें.

### रोगनिवारणाकरितां उपयोग

इच्छाशक्तीच्या सामर्थ्याची एकदां जाणीव झाल्यावर रोजच्या व्यवहारांत तिचा उपयोग कसा करून घेतां येईल इकडे सर्वांचें लक्ष वेधलें. रोगग्रस्त शरीर आणि मृत्यु ह्यांसारखे मनुष्याचे दुसरे कोणीच शत्रु नाहींत. त्यांना जिंकण्याकरतां इच्छाशक्तीच्या सामर्थ्याचा उपयोग करावयाचें मनुष्यानें ठरविल्यास त्यात कांहींच नवल नाहीं. उन्माद, भ्रमिष्टपणा आणि वेडांचे कित्येक प्रकार मनुष्याच्या मनाच्या कमकुवतपणानें उत्पन्न होणारे असल्यामुळें ते बरे करण्याकरतां इच्छाशक्तीचा उपयोग करण्याची कल्पना तर्कशुद्ध विचारसरणीमुळेंच सुचली. अशा रोगांपैकीं कित्येक या इच्छाशक्तीमुळें बरे करता आल्यास त्यांत कांहींच नवल नाहीं. मनुष्या-च्या जीवनांत कित्येक प्रसंगीं असे प्रश्न उद्भवतात कीं, भावनांचा कल्लोळ उसळतो आणि दोन किंवा अधिक भावना सारख्याच प्रबल ठरून वर्तनमार्ग निश्चित करतां येत नाहीं. आणि ह्या भावनांच्या झगड्यांत मनुष्याच्या मनावरील ताबा सुटून तो पूर्ण वेडा होतो किंवा त्याच्या वर्तनांत विसंगति येते. मानसिक रोगांचें हें कारण जरी खरें असलें तरी रोग्याच्या विचारांचें आणि भावनांचें अचूक ज्ञान होणें जवळजवळ अशक्य आहे. आणि असें ज्ञान झाल्याशिवाय त्याच्या मनांतील भावनांमधील युद्ध संपवून त्याच्या विचारांना आणि भावनांना सुसंघटित करणें शक्य नाहीं. रोग-निवारणाकरितां इच्छाशक्तीचा उपयोग करण्याच्या मार्गांत ह्या अशा अनेक अडचणी आहेत. रोगनिवारणाकरितां इच्छाशक्तीचा उपयोग करणारांमध्यें फ्रॉइड आणि युंग ह्या गुरु-शिष्यांचें नांव कोणाला माहीत नाहीं असें नाहीं. त्यांनीं केलेले प्रयत्न प्रशंसनीय आहेत. रोग्याचें मन संपूर्णपणें विसांवा घेत असतां संभाषणद्वारा त्याच्या मनाच्या परिस्थितीबद्दल अंदाज करणें, किंवा सूचक शब्द किंवा विधानें यांना रोग्यानें दिलेल्या उत्तरावरून, तीं उत्तरें देण्यास लागलेल्या वेळावरून किंवा त्यामुळें त्या मनाची चलबिचल यावरून अंदाज बांधणें आणि उपाययोजना करणें असे ते मार्ग आहेत. वरील पद्धतीला मनोविश्लेषण म्हणतात आणि आतां तें एक शास्त्र बनलें आहे. ह्याशिवाय अशा रोग्याची इच्छा-शक्ति निर्बल असल्यामुळें वैद्यानें आपल्या प्रबळ इच्छा-शक्तीच्या सामर्थ्यानें त्याला मोहनिद्रा ( हिप्नॉटिझम् ) आणावयाची आणि त्याच्याकडून त्याच्या भूतकालीन जीवनावर प्रकाश पाडून उपाययोजना करावयाची असाहि एक उपाय करतात. परंतु हें शास्त्र अद्याप बाल्यावस्थेंत असल्याकारणानें रोगपरिहार करण्याकरितां त्याचा कितपत उपयोग होईल हें सांगतां येणार नाहीं. किंवा कित्येक वेळां आलेल्या अपयशामुळें तें अगदीं निरुपयोगी आहे असेंहि म्हणता येणार नाहीं. सध्यांतरी श्रीमंत अमेरिकन बायकांच्या काल्पनिक रोगांचा परिहार करणें आणि मनोविश्लेषण-तज्ज्ञ म्हणून मिरविणाऱ्या अर्ध्याकच्च्या डॉक्टरांना भाग्याचे दिवस दाखविणें एवढेंच काम हें शास्त्र करीत आहे !

---

### तें नवल — !

त्या काळ्या सोज्वळ  
मातीवरतीं  
मी हरखुन नवल पाहिलें हिरवें  
त्या भोळ्या कोमल  
वाऱ्यावरतीं  
मी चमकुन नवल ऐकिलें गहिरें  
त्या काळ्या सोज्वळ  
मातीवरतीं ...  
त्या भोळ्या कोमल  
वाऱ्यावरती  
तें नवल आपुल्या वेळावुन हिरव्या माना  
मज दावित होतें उकलुन गूढ उखाणा !

— राजा मंगळवेढेकर









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा. शि. श्री. काळे

# ग्रामोद्योगांचा प्रश्न

मुंबई राज्य खादी व ग्रामोद्योगसमितीच्या विद्यमानें दि. १७ नोव्हेंबर १९५४ पासून पुढें तीन आठवडे, खादी व ग्रामोद्योगाला अनुलक्षून असलेलें एक भव्य प्रदर्शन पुणें येथें भरविण्यात आलें. दिल्लीलाहि अशाच स्वरूपाचें परंतु अखिलभारतीय असें प्रदर्शनहि नुकतेंच भरविण्यांत आलें होतें. प्रदर्शन म्हटल्यावर तेथें प्रेक्षकांची गर्दी सर्वसाधारणपणे असतेच; तथापि हें प्रदर्शन जवळजवळ तीन लाख प्रेक्षक पाहून गेले हें विशेष होय. पुण्यासारख्या मोठ्या शहरीं प्रदर्शन भरविलें गेल्यानें प्रेक्षकांत शहरवासी जनतेचा अधिक भरणा होता. त्या मानानें फार मोठ्या प्रमाणांत खेडयांतून प्रेक्षक आले नाहीत हें स्वाभाविकच होतें. ग्रामोद्योग व विशेषतः खादीचा संदेश खेड्यांतील जनतेला लवकर समजतो व पटतो; तो संदेश शहरवासियांना लवकर कळत नाहीं व म्हणूनच पटतहि नाहीं. ही वस्तुस्थिति लक्षांत घेऊन व शहरांत राहणाऱ्या शिक्षितांच्याकडे एकंदर जनतेचें नेतृत्व आहे असें कल्पून शहरवासी जनतेनें खादीग्रामोद्योगाचा संदेश समजून घ्यावयास पाहिजे या विचाराच्या दृष्टीनें हें प्रदर्शन शहरांत भरविण्यांत आलें व प्रेक्षकांतहि शहरांत राहाणारी जनताच बहुसंख्येनें होती हें ठीकच झालें. त्याचप्रमाणें शहरांतील सुशिक्षितांचें विशेषतः अर्थशास्त्र समजूं इच्छिणाऱ्यांचें चित्तहि प्रदर्शनानें आपल्याकडे आकर्षित करून घेतलें ही गोष्ट विशेष महत्वाची आहे. सर्वसामान्य जनतेपेक्षां अर्थशास्त्राच्या विद्यार्थ्यांचें लक्ष वेधण्याचें मुख्य कारण असें कीं प्रदर्शनासंबंधीं जी प्रसिद्धि करण्यांत आली होती त्यांत “ खेड्यापाड्यांतील विविध उद्योगधंद्यांचें, त्या उद्योगधंद्यांत कार्यक्षमता क्रमाक्रमानें वाढत आहे याचें, या उद्योगधंद्यांचें प्रमाणबद्ध विकेंद्रीकरण कसें करतां येईल याचें व याहिपेक्षां विशेष म्हणजे खेड्यांतील अर्ध-बेकारी व पूर्ण बेकारी समूलतः कशी नाहींशी करता येईल – अधिक व्यक्तींना पुरेल असा कामधंदा कसा देतां येईल याचें, प्रायोगिक दर्शन करून देण्यांत येणार ” असल्याचें सांगण्यांत आलें होतें. आपल्या देशांतील, विशेषतः अर्ध व पूर्ण बेकारी कशी दूर होईल, अधिक लोकांना पूर्ण काम कसें मिळेल हा तर आमचा प्रधान राष्ट्रीय प्रश्न. या प्रश्नाचें प्रायोगिक पद्धतीनें उत्तर समजून घेण्याची प्रदर्शन ही संधि अपूर्व होती व ती संधि साधून घेण्याची अर्थशास्त्रज्ञांची उत्कट आतुर इच्छाहि अनैसर्गिक नव्हतीच.

राज्यांतील विविध ग्रामोद्योगांचें सम्यक् दर्शन प्रदर्शनांत अभिप्रेत होतें व त्याच दृष्टीनें प्रदर्शनाची एकंदर मांडणी करण्यांत आलेली होती. प्रदर्शनाचे तीन प्रमुख भाग होते : १ प्रयोगदर्शनाचा – प्रात्यक्षिकाचा भाग. २ विशेष विभाग व ३ विक्रीविभाग. प्रात्यक्षिकाच्या पहिल्या विभागांत पहिलें स्थान खादीचें होतें. कापसाच्या सफाईपासून प्रत्यक्ष कपडा तयार होण्यापर्यंतच्या, कपडा तयार झाल्यावर त्याला स्वच्छ करण्याच्या, रंगविण्याच्या सर्व क्रिया प्रत्यक्ष रूपानें दाखविण्यांत आलेल्या होत्या. त्यांत विशेष म्हणजे पॅडल् – पिंजणयंत्र, मोडिया, अंबर व काळे यांचा ऑटोस्पिनर चर्खा, श्री. चितळे यांचे कार्डिंगचें यंत्र. वस्त्राच्या धंद्यांत दुसरें स्थान रेशमाला देण्यांत आलें होते. रेशमाच्या गाळयाची योजना मुंबईराज्य – सहकारी विभागातर्फे करण्यांत आलेली होती. लोकरीसंबंधींचें प्रदर्शनहि अशाच प्रकारचें होतें व त्यांत पुण्याच्या उच्च जातीच्या मेंढ्यांच्या उत्पादन-संशोधन-केंद्राचा व गौरीशंकर स्त्री-शिक्षण-केंद्राचा भाग प्रधान होता. वाख-घायपातापासून सूत काढण्याचें ग्रामोद्योग-प्रायोगिकयंत्रशाळेनें तयार केलेलें यंत्र व दोर वळणारीं लहानलहानशीं जपानी यंत्रें विशेष वाटलीं. बांबू व वेत यासंबंधींचा सर्वांना माहित असलेला ग्रामोद्योगहि येथें हजर होता. मृत जनावरापासून चामडीं विलग करून, सुधारलेल्या पद्धतीनें चामडें कमविण्याच्या व त्यांतूनच सरसासारख्या वस्तूची



अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

उपनिर्मिति करण्याच्या क्रिया विचारार्ह वाटल्या. प्रत्येक वर्षी खेडेगांवांत मरणाऱ्या जनावरांची संख्या लक्षांत घेतां या ग्रामोद्योगास प्रगति करण्यास पुष्कळ मोठा वाव असल्याचें सहजच लक्षांत आलें. चिनी माती, कांच व माती यांचीं भांडीं तयार करणें या कुंभाराच्या उद्योगांत मगन-चूल, मातीचीं चमकदार भांडीं तयार करणें, कांचेचीं खेळणीं, बांगड्या व मणी यांच्या उत्पादनाचें प्रदर्शन योजलेलें होतें.

हात-कागद-उद्योगाच्या प्रदर्शनांतील थोडासा भाग न्यू इंग्लिश स्कूल पुणें ( टिळकरोड ) यांचा होता. फार मोठा भाग हात-कागदसंशोधनकेंद्र पुणें याचा होता. हातानें तयार केलेल्या ग्रामोद्योगी काड्याच्या पेट्याच्या मार्गदर्शनाकरितां ७ गाळे देण्यांत आलेले होते. एरंडाच्या विविध उपयोगाचें प्रदर्शन फर्ग्युसन महाविद्यालयाच्या रसायनविभागानें योजिलें होतें. रोशा या गवताच्या विविध उपयोगांचें प्रदर्शन कामगार-सहकारी-मंडळ खिरोदें, यांनीं केलेलें होतें.

अन्नविषयक उद्योगधंद्यांत भाताची हात-कुटाई, बॉलबेअरिंग्ज असलेली तेलघाणी व दळण्याची चक्की, ताडगूळ, जोशी यांनीं संशोधनात्मक पद्धतीनें ज्वारीपासून तयार केलेला गूळ व मधुमक्षिकापालन या उद्योगधंद्यांचें प्रदर्शन होतें. मधुमक्षिका-पालनाच्या उद्योगांत गेल्या ४-५ वर्षांत झालेली प्रगति आश्चर्यकारक वाटली. मासेमारीचा धंदाहि दाखविण्यांत आलेला होता.

शेतकी व जंगल खात्याचे स्वतंत्र विभाग होते. शेतकी-विभागांत नेहमींच्या इतर वस्तूंबरोबर जपानी पद्धतीच्या भात-शेतीचें प्रदर्शन करण्यांत आलेलें होतें. सेंट्रल कॉटन कमिटीतर्फे कापसाच्या निरनिराळया जातींचें प्रदर्शन करण्यांत आलेलें होतें. याचप्रमाणें रंग व रोगण तयार करणें, स्वस्त किंमतीचीं पोकळ भिंतीचीं घरें, जोशी यांचा गॅस प्लॅन्ट, चाकू-कात्र्या, धूतपापेश्वरचीं औषधें या सर्वांचें प्रदर्शन मांडण्यांत आलेलें होतें. कांहीं गाळे पुण्यांतील राष्ट्रीय रसायनप्रयोगशाळा, यंत्रविद्येचें महाविद्यालय, गामोद्योगसंशोधनकेंद्र, कस्तुरबा-स्मारक-निधीतर्फे चालविण्यांत येणारीं केंद्रें या सर्वांच्या कार्याच्या प्रदर्शनाकरितां योजलेले होते.

दुसऱ्या एका विभागांत राज्यांतील व देशांतील ग्रामोद्योगांच्या विविध प्रवृत्ती व कलाकुसरी दाखविणारा मनोरा, जनतेच्या पंचवार्षिक योजनेचा मंडप, आदिवासींच्या जीवनाचा मंडप, भूदान-आंदोलनाचा व पू. बापूजींचा मंडप हे होते. तिसऱ्या विभागांत ग्रामोद्योगांत निर्माण झालेल्या निरनिराळया वस्तूंच्या विक्रीची व्यवस्था करण्यांत आलेली होती.

अशा प्रकारचें राज्यांतील ग्रामोद्योगांच्या प्रवृत्तींचें भव्य प्रदर्शन पाहिल्यानंतर ग्रामोद्योगांच्या इतिहासाविषयीचें, ग्रामोद्योगांच्या वर्तमान अवस्थेविषयीचें व विशेषतः ग्रामोद्योगांच्या भविष्यकाळाविषयींचे विचार स्वाभाविकपणें उद्भवतात. औद्योगिक समितीनें उल्लेखिल्याप्रमाणें, औद्योगिक उत्क्रान्तीचें जन्मस्थान जीं पाश्चिमात्य राष्ट्रें तीं जेव्हां आर्थिक व सांस्कृतिक दृष्ट्या अप्रगत होतीं, तेव्हां आपल्या देशांतील ग्रामोद्योग फार सुधारलेल्या अवस्थेंत व भरभराटींत होते. ग्रामोद्योगांच्या या भरभराटीमुळेंच पाश्चात्त्य व्यापाऱ्यांचें लक्ष आपल्याकडे वेधलें. हे पुरातन परंपरेचे उद्योगधंदे १८ व्या शतकाच्या अखेरीपासून व विशेषतः १९ व्या शतकाच्या पूर्वार्धापासून, देशी राजेराजवाड्यांचें छत्र नाहींसें झाल्यामुळें, पाश्चात्त्य राज्यकर्त्यांच्या विभिन्न आवडीनिवडीमुळें, ईस्ट इंडिया कंपनीच्या व्यापार-पद्धतीमुळें, आर्थिक स्वातंत्र्याच्या कल्पनेवर आधारलेल्या अनिर्बंध व्यापाराच्या सरकारी धोरणामुळें, आणि सुवेझ कालवा वाहतुकीला खुला झाल्यानंतर पश्चिमेकडे यंत्रसाहाय्यानें निर्माण केलेल्या वस्तू कमी किंमतींत मिळूं लागल्यानें – अवनतीला लागले. तथापि, आपल्या देशांत यांत्रिक कारखान्यांची प्रगति अगदींच अल्पगतीनें व देशाचा विस्तार पहातां अल्पप्रमाण असल्यामुळें, अंतर्गत वाहतुकीचीं साधनें पुरे-पूर न वाढल्यानें हे उद्योगधंदे कसेबसे जीव धरून राहिले. त्यांना यांत्रिक कारखान्यांत तयार झालेल्या वस्तूंच्या स्पर्धेला निर्णायक स्वरूपाचें तोंड द्यावें लागलें नाहीं. हे ग्रामोद्योग शेतकी जीवनाला अनुकूल होते. व फावल्या वेळीं जोडधंदा म्हणून ते उपयोगांत आणले जात. घरच्या वातावरणांत फावल्या वेळेचा जोडधंदा मिळत असल्यानें, आर्थिकदृष्ट्या स्वतंत्रपणें विचार करतां तो कितीसा उपयुक्त आहे याचा फारसा विचार उत्पादकाला करावा लागला नाहीं. हे उद्योगधंदे अल्पप्रमाणावरच चालत असत. सर्वसाधारण रूढिप्रियते-



अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मुळें उत्पादित वस्तूंना गांवांतच उठाव मिळत राहिला.

ग्रामोद्योगांच्या सध्यांच्या अवस्थेबद्दल कोणतेंहि निश्चित विधान करतां येत नाहीं. त्याचें पहिलें कारण असें कीं ग्रामोद्योग कोणत्या उद्योगधंद्यांना म्हणावयाचें व कोणत्या उद्योगधंद्यांना म्हणावयाचें नाहीं याविषयींच्या कल्पना स्पष्ट नाहींत. ग्रामोद्योग, अल्प प्रमाणांत चालणारे उद्योग, हस्तकौशल्य-कला-कुसरीचे उद्योग या विषयींच्या सर्वमान्य व्याख्या अजून अस्तित्वांत नाहींत. दुसरें असें कीं या उद्योगधंद्यांची माहिती, विशेषतः उद्योगाला लागणारें भांडवल, साधनसामग्री कच्चा माल, मजूर, उद्योगांत मिळणारा फायदा अथवा तोटा कशाचेहि पुरेसे व विश्वासार्ह असे आंकडे मिळत नाहींत. त्यामुळें या उद्योगधंद्यांची आजची अवस्था व त्यांचें आजचें स्थान याविषयीं कोणत्याहि प्रकारचें साधार विधान करतां येण्यासारखें नाहीं.

तथापि देशांतील आर्थिक स्थित्यंतराची दिशा पहातां, ग्रामोद्योगहस्तव्यवसायाचे व कलाकुसरीचे उद्योगधंदे व अल्प प्रमाणाचे उद्योगधंदे यांचें बरेंच मोठें महत्त्व आहे असें दिसून येतें. शेतीवर अवलंबून असलेल्या बहुसंख्य जनतेची अर्धबेकारी दूर करण्यांत जोडधंद्यांना एक महत्त्वाचें स्थान आहे. राष्ट्रांतील उत्पादनसाधनाचें व उत्पादनाचें समान वांटप झालें पाहिजे, संपत्तीचें भांडवलदारी केंद्रीकरण व त्यांतून निर्माण होणारी विषमता व वर्गबारी मूलतः नाहींशी होण्याच्या दृष्टीनें उत्पादनाचें विकेंद्रीकरण झालें पाहिजे हा विचारहि सर्वमान्य झालेला आहे. परंतु याहिपेक्षां अधिक महत्त्वाचें म्हणजे देशांतील बेकारी दूर करण्याचें, सर्वांना रोजगार मिळवून देण्याचें ग्रामोद्योग हें एक अमोघ साधन आहे, असें म्हणण्यांत येतें तें कितपत बरोबर व कितपत उपयुक्त साधन आहे हें तपासून पाहिलें पाहिजे व देशाच्या सध्यांच्या आर्थिक स्थित्यंतराच्या काळांत अल्प प्रमाणाच्या ग्रामोद्योगांना काय स्थान आहे याचा विचार झाला पाहिजे.

कोणत्याहि देशाच्या आर्थिक प्रगतीचा संबंध दोन प्रक्रियांबरोबर असतो. पहिल्या प्रक्रियेचा संबंध जनसमुदायाचें साकल्यानें निर्माण होणारें उत्पन्न व जनसंख्या यांबरोबर असतो. जनसमुदायाचें उत्पन्न साकल्यानें व जनसंख्येपेक्षां अधिक त्वरित गतीनें वाढावें लागतें. साकल्याचें आर्थिक उत्पन्न जलद गतीनें वाढलें तरच, जनसंख्या अल्पप्रमाणांत वाढली तरी प्रत्येक व्यक्तीचा वांटा वाढतो, दर डोई उत्पन्न वाढतें व जनतेच्या जीवनाचा आर्थिक स्तर अधिक उच्च होतो.

दुसऱ्या प्रक्रियेचा संबंध जनतेच्या अभ्युदयाबरोबर असतो. संपत्तीची विषम वांटणी आर्थिक अभ्युदयाला अडथळा उत्पन्न करते. विशेषतः आर्थिक दृष्ट्या अप्रगत असलेल्या देशांत संपत्तीची विषम वांटणी पदोपदीं अडथळे आणते. आपल्यासारख्या अर्धभुकेलेल्यांच्या कंगाल देशांत संपत्तीची वांटणी फार विषमतेनें होते. स्थूलतः देशांतील ६६% जनतेला राष्ट्रीय उत्पादनांतील ३३% टक्के भाग मिळतो. मध्यम वर्ग तर दुसऱ्या महायुद्धानंतर नष्टप्राय झालेला आहे. तथापि स्थूलमानानें मध्यम वर्गांतील शेंकडा ३३% व्यक्तींना राष्ट्रीय उत्पादनाचा ३३% टक्के भाग मिळतो. राष्ट्रीय उत्पादनाच्या उरलेल्या ३३% भागाचा उपभोग उरलेली जनता घेते. तेव्हां राष्ट्राच्या आर्थिक नियोजनाच्या प्रक्रियेंत देशाच्या राष्ट्रीय आयाची वाढ होण्याबरोबरच देशांतील आर्थिक विषमता दूर करण्याचा भाग असणें अपरिहार्य ठरतें.

अप्रगत राष्ट्रांतील आर्थिक उत्क्रांतीचा मार्ग अधिक कठीण असतो. देशांतील उत्पन्न साकल्यानें वाढविण्याच्या दृष्टीनें उपलब्ध असलेल्या साधनसामग्रीची उत्पादनक्षमता अधिक वाढवावी लागते. प्रत्येक व्यक्तीची व प्रत्येक साधनाची उत्पादनक्षमता वाढविण्याकरितां विज्ञानाची व वैज्ञानिक साधनांची वाढ व्हावी लागते. व विज्ञान आणि वैज्ञानिक साधनांची वाढ होण्याकरित भांडवलाची निर्मिति व वाढ मोठया प्रमाणांत व्हावी लागते. तात्पर्य, अप्रगत राष्ट्रांतील जनतेला आर्थिक प्रगतीची दुर्दम्य इच्छा असलीं, खनिजसंपत्तीसारखीं आवश्यक साधनें उपलब्ध असलीं, प्रगतीला आवश्यक अशा संस्थाहि अस्तित्वांत असल्या तरी देशांत अधिक प्रमाणांत भांडवल निर्माण व्हावें लागतें व वाढावें लागतें.

देशाच्या आर्थिक प्रगतीच्या दृष्टीनें, देशांत मोठया प्रमाणाचे कारखाने व उद्योगधंदे उभारले गेले पाहिजेत, असें म्हटलें जातें. मोठया उद्योगधंद्यांबरोबरच अल्पप्रमाणाच्या उद्योगधंद्यांना आधुनिक विज्ञानाची—



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बीज व यंत्रें यांची जोड दिली गेली पाहिजे, अशा प्रकारच्या 'औद्योगीकरणा'नें देशांतील वार्षिक आय वाढेल व अनेक व्यक्तींची बेकारी नाहींशी होईल असेंहि म्हटलें जातें. मोठ्या प्रमाणाचे उद्योगधंदे मोठ्या प्रमाणांत उभारून, छोट्या उद्योगांना व ग्रामोद्योगांना आधुनिक विज्ञानाची जोड देऊन देशांतील उत्पादन किती प्रमाणांत वाढेल, किती व्यक्तींना या क्रियेंतून रोजगार देतां येईल हे सर्व मुद्दे विचारार्ह असले तरी विवाद्य आहेत. विशेष म्हणजे असें कीं या मुद्द्यांवर अनुकूल-प्रतिकूल मत अभिनिवेशानें मांडणाऱ्यांची अवस्था बाजारच्या तुरीवर भांडणाऱ्या स्त्रीपुरुषासारखी आहे ! मुख्य प्रश्न अशा प्रकारची योजना उपयुक्त म्हणून मान्य जरी केली तरी ती अमलांत येण्याकरिता लागणारी साधनसामग्री–विशेषतः भांडवल कोठून येणार ? औद्योगीकरणाला आवश्यक असें भांडवल सरकारनें अथवा खासगी धनपतीनें किंवा उद्योगपतीनें जमविलें पाहिजे असेंहि म्हटलें जातें. सरकारची अथवा उद्योग-धनपतीची औद्योगीकरणास आवश्यक अशी साधन जमविण्याची कुवत नाहीं हें तर सुस्पष्ट आहे. परंतु त्याहिपेक्षां अधिक विचाराची गोष्ट अशी कीं अशा प्रकारच्या दृष्टिकोनांत आपली दृष्टि सर्वसामान्य जनतेकडे – खेड्याकडे नसते; आपली दृष्टि दिल्लींत रहाणारी सरकारी यंत्रणा व मोठ्या शहरांत राहणारे उद्योगपती यांच्याकडे असते. अशा प्रकारच्या दृष्टिकोनांतून निर्माण झालेल्या योजनेला अल्पसंख्य व्यक्तींचाच आधार असतो. बहुसंख्य जनतेचा त्यांत कांहीं भाग नसतो. ती योजना जनतेची योजना होत नाहीं. जनतेच्या दृष्टीनें ती तिच्या अभ्युदयाची योजना न होतां सरकारकडून मिळालेला पैसा खर्च कसा करावा याची ती योजना ठरते. योजना सर्वसाधारण जनतेची होण्याच्या दृष्टीनें विचाराचा व कृतीचा प्रारंभ खेड्यापासून झाला पाहिजे.

उदाहरणाकरितां आपण १००० लोकवस्तीचें एक गांव घेऊं. या गांवांत ७०% लोक शेती व तिला आनुषंगिक उद्योगांवर अवलंबून आहेत व ३०% बिनशेती उद्योगधंद्यांवर अवलंबून आहेत असें समजूं. म्हणजे ७०० व्यक्ती शेतीवर व ३०० बिनशेतीवर अवलंबून रहातील. शेतीवर असणाऱ्या प्रत्येक व्यक्तीचें दरसाल दरडोई सरासरी उत्पन्न ८५ रुपये म्हणजे शेतीचे एकूण उत्पन्न (८५×७००) = सुमारें ६०,००० रुपये होते. त्याचप्रमाणें बिनशेती व्यक्तीचे दरसाल सरासरी दर डोई उत्पन्न १३० रु. म्हणजे एकूण बिनशेती उत्पन्न (१३० ×३००)=सुमारें ४०,००० रु. होतें सर्व खेड्यांची एकूण वार्षिक आय (६०,०००+४०,०००) १००,००० रुपये होईल असें आपण समजूं. याचप्रमाणें जनसंख्येंत प्रतिवर्षी दर शेंकडा १·२५% प्रमाणानें वाढ होते असें समजल्यास म्हणजे एकंदर खेड्यांत प्रत्येक वर्षी १२·५ व्यक्तीची भर पडेल. त्यांपैकीं शेतकरी कुटुंबांतील व्यक्ती स्थूलमानानें ८·७ असतील व बिनशेतकी कुटुंबांतील ३·७ असतील. आंकडे काल्पनिक वाटण्याचा संभव आहे. तथापि आंकड्यामागें सत्याचा आधार आहे. अप्रगत राष्ट्रांतील परिस्थितीबाबत केलेल्या संशोधनावर ते आधारलेले आहेत. अशा प्रकारच्या खेड्याच्या आर्थिक प्रगतींत तीन प्रश्न प्रामुख्यानें उद्भवतात. शेतकीवर अवलंबून असलेल्या व्यक्तींची संख्या फार आहे. तेव्हां जास्त जास्त जनतेला शेतकीच्या आजीविकेच्या साधनापासून परावृत्त करून त्यांना इतर उद्योगधंद्यांत गुंतविणें – शेतकीखेरीज इतर निराळें आजीविका-साधन त्यांना निर्माण करून देणें हा पहिला प्रश्न आहे. शेती व बिनशेती उद्योगधंद्यांत समप्रमाण निर्माण करण्याकरितां– सध्याच्या शेतकऱ्यांना इतर उद्योगधंदे निर्माण करून देणें तर दूरच राहो, पण शेतींत प्रतिवर्षी वाढणाऱ्या जनतेलाच शेतकीखेरीज इतर उद्योगधंद्यांत गुंताविण्याचा प्रश्न विचारांत घेतला पाहिजे. दुसरा प्रश्न बिनशेतकी उद्योगधंद्यांतील नव्या वाढीला (३·७ व्यक्तींना) बिनशेतकी उद्योगधंद्यांतच स्थिर करणें. व तिसरा प्रश्न शेतीचें उत्पादन वाढविणें. शेती करणाऱ्या जनतेची संख्या (७००) स्थिरच राहील व तितक्याच व्यक्तींना खेड्यांतील सर्व लोकसंख्या + तींत दरवर्षी होणारी नवीन वाढ (१०००+१२·५) इतक्यांना पुरेल इतकें अन्नधान्य निर्माण करावें लागेल.– शेतकऱ्याचें दरडोई उत्पन्न वाढवावें लागेल. अशा प्रकारची योजना पूर्णतया अनुसरतां आली तर शेतकी व बिन-शेतकी उद्योगधंद्यांचें समप्रमाण लवकरांत लवकर म्हणजे १०० वर्षांत निर्माण होईल.

इतक्या अल्प स्वरूपाची प्रगति साधण्याकरितां सध्यांचे मूल्यस्तर विचारांत घेतां किती भांडवल लागेल




मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

याची आंकडे-मोडी करून पहावयास पाहिजे. शेतकी-वर अवलंबून असलेल्या प्रत्येक व्यक्तीला शेतकीखेरीज इतर निर्वाहसाधन उपलब्ध करून देण्याकरितां दर व्यक्ती-मागें रु. १५०० चें भांडवल लागेल. म्हणजे ८·७ व्यक्तींना सरासरीनें १३०५० रु. लागतील. भांडवल व उत्पादन याचें तेंच परिमाण मान्य करून ३·७ व्यक्तींना बिनशेतकी व्यवसायांत स्थिर करण्याकरितां रु. ५२०० लागतील. शेतकीचें उत्पादन कमींत कमी १·२५ टक्के ( जनसंख्येची वाढ लक्षांत घेऊन ) वाढलें पाहिजे. तथापि आर्थिक प्रगतीच्या काळांत अप्रगत राष्ट्रांतील व्यक्तीची अन्नविषयक गरज जास्त प्रमाणांत वाढते असा अनुभव आहे. तेव्हां आपल्याला अन्नधान्यांत ३% टक्के वाढ करावयास हवी. अधिक-धान्य-उपजमोहिमेंतील व्ययाचे आंकडे विचारांत घेतां शेतकीचें ३% टक्के उत्पादन वाढविण्यास स्थूल मानानें ७,२०० रु. खर्च येईल. – म्हणजे इतक्या अल्प अपेक्षेची आर्थिक योजना पार पाडण्यास एकंदर २६,८०० रु. चें भांडवल गुंतवावें लागेल. खेड्याची वार्षिक आय लक्षांत घेतां सकल उत्पन्नांतील २७% आय इतकी साधी योजना पार पाडण्याकरितां गुंतवावी लागेल. अप्रगत राष्ट्राची बचत-शक्ति फार कमी असते. सर्वसाधारणपणें राष्ट्रीय उत्पादनाचा ६% या पलीकडे ती जात नाहीं. आपल्या उदाहरणांतील खेड्याविषयीं बोलावयाचें झालें तर जास्त जास्त ६००० वार्षिक बचत होईल. मग उरलेली २१% तूट (२१,००० रु.) कशी भरून काढावयाची ?

देशाच्या भाषेंत बोलावयाचें झालें तर आपलें प्रतिवर्ष राष्ट्रीय उत्पन्न स्थूल मानानें ९००० कोटी रुपये आहे. नियोजनाच्या ५ वर्षांत आपण २०६९ कोटी किंवा ३००० कोटी भांडवली पद्धतीनें गुन्तवीत आहोंत – म्हणजे दरवर्षी सरासरी ४१५ कोटी. म्हणजे राष्ट्रीय-उत्पादनाच्या ४½ ते ५½% यापेक्षां अधिक भांडवल-निर्मिति होत नाहीं. दर डोई २६० रु. प्रतिवर्षीचें उत्पन्न समजल्यास प्रत्येक व्यक्तीमागें ५ वर्षांत आपण ११ रु. भांडवलनिर्मिति करीत आहोंत. नियोजनाचें वरच्या उदाहरणांत कल्पिलेलें अगदीं साधें उद्दिष्ट जरी साधावयाचें म्हटलें तरी प्रतिवर्षी २१ टक्क्याची तूट येणार. म्हणजे पांच वर्षांत जी आपण भांडवल-निर्मिति करतों ती एका वर्षांत झाली पाहिजे. हें तर आपल्यासारख्या अप्रगत राष्ट्राला अशक्य आहे. तात्पर्य, भांडवलाच्या प्रचंड तुटीच्या अभावीं मोठे उद्योग-धंदे, कारखाने, लहान उद्योगधंद्यांना यंत्राची व विजेची जोड देणें – यांचा विचार, हें सर्व साध्य करण्याचीं साधनें आपल्याकडे नसल्यानें, आज फोल आहे. अर्थशास्त्रज्ञांनीं तरी हा भाग पूर्णतया मान्य केला पाहिजे.

भांडवलाच्या अभावीं अल्पप्रमाणांच्या व श्रमप्रधान योजना आपल्याला स्वीकाराव्या लागत आहेत. या श्रमप्रधान योजनेंत ग्रामोद्योग व अल्पप्रमाणाचे उद्योग-धंदे यांना निश्चित स्थान आहे. त्याचप्रमाणें एक आणखी विचार समजून घेतला पाहिजे. आजपर्यंत शहर व खेडीं यांच्या आर्थिक देवाण-घेवाणींत खेड्याची पिळणुक झाल्याचें आपण पहातों. यापूर्वी शहरानें खेडयांतून खूप घेतलें पण कमी दिलें. आतां ही देवाण-घेवाण समप्रमाणाची किंवा खेड्याला अनु-कूल अशी झाली पाहिजे. शहरांतून खेडयाकडे अधिक संपत्ति आकर्षिली गेली पाहिजे. या दृष्टीनें उपभोगाच्या, कळा-कुसरीच्या किंमती वस्तू खेड्यांत निर्माण होऊन शहरांत विकल्या गेल्या पाहिजेत. या वस्तू एकरूप नसतात व त्यामुळें त्यांचें यांत्रिक व मोठ्या प्रमाणावरील उत्पादन शक्य होत नाहीं. तेव्हां या वस्तूंच्या उत्पादनाशीं संबद्ध अशा ग्रामोद्योगांना आर्थिक उत्क्रान्तीच्या काळांत स्थान आहे हें स्पष्ट आहे.

ग्रामोद्योग सर्वांना रोजगार पुरवूं शकतो, विशेषतः अर्ध-बेकारांना त्याच्या शेतकीच्या गांवींच काम देतो व म्हणून त्याला निश्चित स्थान आहे. तथापि ग्रामोद्योग देशांतील सर्व प्रकारची बेकारी दूर करू शकेल असें सांगण्यांत येतें तें कितपत बरोबर आहे व कितपत उपयुक्त आहे हें परीक्षून पहावयास हवें. स्थित्यंतराच्या काळांत ग्रामोद्योगांत उपयोगांत आणलें जाणारें तंत्र अप्रगत व कमी कार्यक्षम राहणार. किंबहुना अप्रगत व कमी कार्यक्षम अशा तंत्रामुळेंच अधिक व्यक्तींना रोजगारी देतां येणार. स्थित्यंतराच्या काळांत अप्रगत कमी कार्यक्षम अशी उत्पादनपद्धति मान्य केली तरी पुढील काळाकरितां अधिक व्यक्तींना रोजगारी देण्याच्या दृष्टीनें तीच पद्धत चालवावी किंवा नाहीं हा प्रश्नच आहे. बेकारी दूर करणें हा एक महत्त्वाचा गंभीर प्रश्न आपल्या देशासमोर आहे.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

तो प्रयत्नपूर्वक सोडविला गेलाच पाहिजे, याहिविषयीं कुणाचें दुमत असूं शकत नाहीं. प्रश्न इतकाच आहे कीं हा प्रश्न सोडविण्याकरिता अल्पकालीन दृष्टि ठेवावयाची की दीर्घकालीन ? सध्यांच्या कोणत्याहि उद्योगधंद्यांतील क्रियांचे अनेक तुकडे करून, प्रत्येक लहान लहान क्रियेकरितां उपयोगांत येणारीं यंत्रें काढून टाकून आज अनेक व्यक्तींना रोजगारी देतां येईल. पण दूरचा विचार करतां हा प्रयोग योग्य ठरणार नाहीं. आज असलेला रोजगारी स्तर असाच कायम ठेऊन निरनिराळया अल्प व मोठ्या प्रमाणाच्या उद्योगांत पांच वर्षांनंतर बहुसंख्यांना रोजगारी देणें कदाचित् जास्त उपयुक्त ठरावें.

प्रगतीची कोणतीहि योजना आंखतांना विशेषतः एकाद्या उद्योगधंद्याच्या उपयुक्तानुपयुक्ततेविषयीं विचार करतांना तीन बाबींचा स्वतंत्रपणें विचार करावा लागतो : १ उद्योगधंद्यास लागणारें भांडवल व त्या भांडवलाच्या विनियोगानें निर्माण होणारी आय. २ उद्योगामुळें उत्पन्न होणारी रोजगारी व ३ उद्योगधंद्यांतून निर्माण होणाऱ्या वस्तूचें मूळ मूल्य ( costs ). उद्योगाला लागणारें भांडवल यासंबंधींचा विचार वर आला आहेच. आर्थिक विकासांत संपत्तीचें समान विभजन व्हावें, त्यांत विषमता नसावी याहि दृष्टीनें रोजगारीचा प्रश्न महत्त्वाचा ठरतो. एकादा उद्योग कितीजणांना रोजगारी पुरवूं शकतो याचें मूल्यमापन व्हावें लागतें. भविष्यकाळाकडे दृष्टि ठेऊन उत्पन्न होणाऱ्या वस्तूचें मूळ मूल्य काय पडतें याचाहि विचार करावा लागतो. जसाजसा उद्योग अधिक प्रगत होईल तसें तसें वस्तूचें मूळ मूल्य कमी कमी व्हावयास पाहिजे. कमी कमी होणारें मूळ मूल्य हें त्या उद्योगाच्या नैसर्गिक प्रगतीचें एक लक्षण आहे. तेव्हां कोणत्याहि उद्योगधंद्याच्या युक्तायुक्ततेविषयींचा निर्णय घेतांना वरील तीन बाबींचा साकल्यानें व तौलनिक पद्धतीनें विचार करून त्या तिन्हीचें ज्यांत अत्यंत उपयुक्त असें प्रमाण साधेल असा उद्योग-धंदा निवडावा लागतो. अद्ययावत् पद्धतीच्या सामग्रीनें अनेक वस्तू प्रचंड प्रमाणांत व अत्यंत अल्प मूळ मूल्यांत निर्माण करतां येतील. परंतु त्यांत फार थोड्या व्यक्तींना रोजगार मिळेल. निव्वळ रोजगारी देणें हें उद्दिष्ट बरोबर ठरत नाहीं, हेंहि निश्चितपणें लक्षांत घेतलें पाहिजे. अधिक व्यक्तींना रोजगारी देण्याकरितां लोखंडाच्या नांगराऐवजीं आपण खुरपीं वापरण्याचा कोणी विचार करीत नाहीं !

भांडवलाचा फार मोठा तुटवडा आपल्या देशांत असल्यानें त्याबद्दल आपल्याला कांहींच करतां येण्यासारखें नाहीं. तेव्हां राहिलेल्या दोन बाबींचा, रोजगारी व उत्पादन-मूल्य यांचा तौलनिक अभ्यास करून, ज्या उद्योगधंद्यांत त्यांचें उपयुक्त प्रमाण आढळतें तो आपल्याला स्थापन करावा लागणार. या दृष्टीनें विशेषतः स्थित्यंतराच्या काळांत आपल्याला ग्रामोद्योगांवर, अल्पप्रमाणांत चाललेल्या उद्योगधंद्यावर व हस्तव्यवसायाच्या कलाकौशल्याच्या उद्योगांवर अवलंबून रहावें लागणार हें स्पष्ट आहे.

ग्रामोद्योग, अल्पप्रमाणाचे व हस्तकौशल्याचे उद्योगधंदे यांच्या आगामी काळांतील स्थानाविषयींचे विचार स्थूलमानानें वर मांडले आहेत. तथापि निरनिराळया ग्रामोद्योगांत व अल्पप्रमाणाच्या उद्योगधंद्यांत किती भांडवल लागतें, त्या उद्योगधंद्यांतून किती जणांना रोजगारी मिळूं शकते, त्या उद्योगांत निर्माण झालेल्या वस्तूची मूळ किंमत काय पडेल, तो उद्योगधंदा कोठें सुरू करावा – यांविषयीं अधिक सूक्ष्मपणें विचार झाला पाहिजे. याकरितां वरील प्रश्नाबद्दलची माहिती मोठया प्रमाणांत संकलित केली पाहिजे. विश्वासार्ह व पुरेशा माहितीची आज फार मोठ्या प्रमाणांत वाण आहे. माहिती एकत्रित करण्याचें काम प्रादेशिक भूमिकेवर झालें पाहिजे. अशा स्वरूपाचें संशोधनात्मक काम खादी व ग्रामोद्योगसमितीनें त्वरित अंगावर घ्यावें. म्हणजे त्या संशोधनाच्या आधारावर निरनिराळया प्रदेशांत कोणते ग्रामोद्योग स्थापिले पाहिजेत, कोणत्या ग्रामोद्योगांना उत्तेजन दिलें पाहिजे व कोणत्या ग्रामोद्योगांना विरोध केला पाहिजे याची निश्चित कल्पना येईल. अशा प्रकारची माहिती गोळा करण्याची योजना जर समितीनें आंखली व ती पार पाडली तर देशाच्या नियोजनांत एक मोठा टप्पा गांठला जाईल यांत शंका नाहीं.

---



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सारसंकलन

## प्रजासमाजवादी पक्षाचें नागपूर अधिवेशन

गेलीं दोन वर्षें प्रजासमाजवादी पक्षाच्या नेत्यांमधील मतभेद धुमसत होते. त्रावणकोर-कोचीनमधील समाजवादी सरकारनें तामीळभाषिक निदर्शकांवर गोळीबार केला. त्या निमित्तानें त्या मतभेदाचा एकाएकीं स्फोट झाला. गोळीबार हें त्या मतभेदाचें केवळ एक निमित्तकारण होतें हें नंतर लगोलग घडलेल्या पक्षान्तर्गत घटनांवरून स्पष्ट होत गेलें. गोळीबार झाला त्यावेळीं डॉ. लोहिया हे तुरूंगांत होते. त्यांनीं दुसऱ्याच दिवशीं त्रावणकोर-कोचीनचे मुख्यमंत्री पट्टम थानु पिल्ले यांना तार करून 'गोळीबाराची चौकशी करा व तावडतोब राजीनामा द्या' अशी मागणी केली. पिल्ले ह्यांनीं डॉ. लोहिया ह्यांची मागणी झिडकारून लाविली. त्यावर डॉ. लोहियांनीं पक्षाच्या अध्यक्षांकडे कार्यकारिणीच्या बैठकीची मागणी केली. त्याप्रमाणें दिल्ली येथें ता. ४, ५, ६ सप्टेंबर ( १९५४ ) ला कार्यकारिणीची बैठक झाली. त्या बैठकींत कार्यकारिणीनें मंत्रिमंडळाच्या राजीनाम्याची मागणी अयोग्य ठरवून मंत्रिमंडळाला चौकशीसमिति नेमण्याचा आदेश देणारा व गोळीबाराबाबत जनतेकडे दिलगिरी प्रदर्शित करणारा ठराव पास केला. त्या निर्णयाच्या निषेधार्थ डॉ. लोहिया व त्यांचे साथीदार ह्यांनीं कार्यकारिणीचे राजीनामे दिले. शेवटीं जयप्रकाशजींच्या सूचनेवरून पक्षाचें खास अधिवेशन नोव्हेंबर महिनाअखेर नागपूर येथें भरविण्यांत आलें. तेव्हां ह्या अधिवेशनांत केवळ गोळीबार — प्रकरणाचा विचार न होतां पक्षनेत्यांमधील इतर मूलभूत व तात्त्विक मतभेदांची चर्चा होऊन त्यांचें निराकरण होईल व पक्षान्तर्गत ऐक्य अधिक भरीव पायावर प्रस्थापित होईल अशी पक्षसभासदांची व इतरांची देखील अपेक्षा होती. तेव्हां ह्या अपेक्षेच्या दृष्टीनें पक्षाच्या ह्या अधिवेशनाच्या फलनिष्पत्तीसंबंधीं प्रजासमाजवादी पक्षाच्या एका विचारवंत सदस्यांनीं केलेलें मूल्यमापन म्हणून 'मौज' साप्ताहिकाच्या ता. ५ डिसेंबरच्या अंकांत प्राध्यापक **राम जोशी** ह्यांनीं घेतलेला आढावा उद्बोधक वाटेल. मतभेदाच्या पार्श्वभूमीविषयीं प्रा. जोशी लिहितात : "पंडित नेहरूंशीं पक्षनेत्यांचीं जीं बोलणीं झालीं तेव्हांपासून मतभेदांना सुरुवात झाली, असें म्हणतां येईल. अशोक मेहता, आचार्य कृपलानी, जयप्रकाश आदि नेत्यांच्या मतें काँग्रेसबरोबर अधिक सहकार्याचें धोरण प्र. स. पक्षानें आखणें जरूर आहे ह्याच भूमिकेवरून हीं बोलणीं झालीं. साथी अशोक मेहतांनीं त्यांचा सिद्धान्त बनवून तो बैतुल येथें मांडला. डॉ. लोहिया, मधु लिमये ह्यांच मत अगदीं विरुद्ध होतें. काँग्रेस व कम्युनिस्ट पक्ष समाजवादी पक्षाला सारखेच दूर आहेत असा सिद्धान्त लोहिया ह्यांनीं मांडला. बैतूल येथें लोहियांची सरशी झाली. त्याच अधिवेशनांत उभय पक्षांतील कार्यकर्त्यांची एक समिति नेमण्यांत आली. तिचे लोहिया व मेहता हे संयुक्त चिटणीस निवडले गेले. या समितीनें पक्षाची तात्त्विक भूमिका व कार्यक्रम निश्चित करावा व त्याच्या अनुषंगानें पक्षाचें कार्य चालावें असें ठरलें. त्या समितीशीं अशोक मेहतांनीं मुळींच सहकार्य केलें नाहीं. त्यामुळें डॉ. लोहिया व त्यांच्या विचाराचे कार्यकर्ते ह्यांनीं आपल्या धोरणाचा मसुदा तयार केला व पक्षाच्या अलाहाबाद-अधिवेशनापुढें मांडला. हें धोरण अशोक मेहता, कृपलानी वगैरे नेत्यांना अणुभरहि पसंत नसतांना त्यांनीं आपलीं तोंडें बंद ठेवलीं व अशा रीतीनें अलाहाबादचें धोरण एकमतानें मंजूर झालें ... ज्यांनीं लोहिया यांचें धोरण स्वतःला पसंत नसतांहि अलाहाबादला पास होऊं दिलें त्यांनींच असहकाराचें धोरण अवलंबिलें व खाजगी रीत्या त्या धोरणावर टीका करावयास सुरवात केली."

अशा रीतीनें पक्षनेत्यांमधील मतभेदाची पूर्वपीठिका देऊन प्रा. जोशी ह्यांनीं गोळीबार-प्रकरणीं नागपूर अधिवेशनांत झालेल्या वादविवादाचा वृत्तान्त आपल्या लेखांत दिला आहे. अधिवेशनामध्यें अशोक मेहता ह्यांनीं गोळीबार-प्रकरणीं ठराव मांडला तो असा : "प्रजासमाजवादी पक्षाचें हें खास अधिवेशन पक्षाच्या राष्ट्रीय कार्यकारिणीनें आपल्या ४, ५, ६ सप्टेंबरच्या दिल्ली येथील बैठकींत त्रावणकोर-कोचीनमधील गोळीबारासंबंधीं जो ठराव केला आहे त्यास अनुमति देत आहे." वरील ठरावास डॉ. लोहिया गटातर्फे उपसूचना सुचविण्यांत आली ती अशी : "आणि त्रावणकोर-कोचीनच्या मंत्रिमंडळास ताबडतोब राजीनामा देण्याचा आदेश देत आहे." अधिवेशना-



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मध्यें उपसूचना २१७ विरुद्ध ३०३ मतें पडून नापास झाली व मूळ ठराव पास झाला.

नैमित्तिक वाद अशा रीतीनें असला तरी मेहता व लोहिया गटांमधील वैचारिक मतभेदाचें निराकरण झालें नाहीं तेव्हां प्रजासमाजवादी पक्षाच्या अन्तर्गत ऐक्यासंबंधीं नागपूर अधिवेशनाची फलश्रुति सांगतांना प्रा. जोशी लिहितात :

" पण पक्षापुढें अद्यापीहि 'पुढें काय' हें प्रश्नचिन्ह उभें आहेच. नरेन्द्र देवांच्या निवडीनें तो प्रश्न सुटला नसून तो नुकताच सुरू झाला आहे असें म्हणता येईल. पक्षांतील दोन्हीं गटांना नरेन्द्रदेवांचें नेतृत्व मान्य आहे असें गृहीत धरलें, तरी ज्या मूलभूत मतभेदांमुळें पक्षांत अशी परिस्थिति निर्माण झाली आहे ते मतभेद मिटले आहेत काय ? मुळींच नाहीं. उलट, ते अधिक विकोपास गेले असून शिवाय वैयक्तिक द्वेषामुळें वातावरण इतकें बिघडलें आहे कीं मतभेदांची मोकळया मनानें चर्चा करणेंहि कठीण होत चाललें आहे. अशा परिस्थितींत मूलभूत धोरणाची चर्चा टाळून घडवून आणलेला सामोपचार टिकणार नाहीं. अधिवेशनांत कुठल्याहि मूलभूत प्रश्नाची चर्चा झाली नाहीं; तेथें कसलाच अंतिम निर्णय लागला नाहीं; म्हणून नागपूर अधिवेशनानें कांहींहि साधलें नाहीं. उलट, द्वेषाचा वन्हि फुंकर घालून चेतविला. "

### श्री. विश्वेश्वरअय्या ह्यांचा इषारा :

पुणें येथील एन्जिनियरिंग कॉलेजच्या शताब्दीदिनाच्या महोत्सवप्रसंगीं ( १४।१२।५४ ) अध्यक्षपदावरून भाषण करतांना श्री. विश्वेश्वरअय्या ह्यांनीं परदेशामधून यन्त्रसामग्री व तज्ज्ञ ह्यांची आयात करण्याच्या भारत सरकारच्या धोरणावर केलेली टीका चिन्तनीय आहे. श्री. अय्या आपल्या भाषणांत म्हणतात :

" हल्लीं जगाच्या निरनिराळया विभागांतून एंजिनियरिंग यंत्रसामग्रीची आयात भारतांत फार मोठ्या प्रमाणावर होत आहे; व देशाच्या संरक्षणासाठीं व जनतेच्या उत्पादनक्षमतेची वाढ करण्यासाठीं आवश्यक असलेले कोट्यवधि रुपये परदेशांत ओतले जात आहेत.

" औद्योगिक कारखान्याच्या उभारणीसाठीं देखील जगाच्या निरनिराळया विभागांतून यंत्रशास्त्रज्ञांची आवक करण्यांत येत आहे. ह्याचा देशाच्या प्रगतीवर नैतिक दृष्टया अतिशय प्रतिकूल परिणाम होत असून त्यामुळें आमच्यामधील बुद्धिवान् व महत्त्वाकांक्षी व्यक्तींना आपली वैचारिक वाढ करण्याची व आपल्या उपक्रमशीलतेचा उपयोग करून देशांतील यांत्रिक शक्तीची वाढ करण्याची संधि मिळत नाहीं.

" आपल्या देशांत हुषार व कर्तबगार माणसें आहेत. ती सारींच यांत्रिक तज्ज्ञ ह्या सदरांत मोडत नसतील. पण तीं माणसें कार्य करण्यास अवसर मिळण्याची वाट पहात आहेत. अशा माणसांना मोठमोठ्या उद्योगधंद्यांत काम करून शिक्षण घेण्याची संधि देणें हा आपल्या देशामधील उद्योगधंद्यांची प्रगति घडवून आणण्याचा एक अतिशय चांगला उपाय आहे. वालचंद अगर बिर्ला ह्यांचें तांत्रिक शिक्षण झालेलें नव्हतें.

" मी 'टाटा आयर्न ॲण्ड स्टील' कंपनीचा गेलीं २५ वर्षें संचालक आहे. ह्या बाबतींत त्या कंपनीनें अत्यंत सावधगिरीचें धोरण ठेविलेलें आहे. ती कंपनी इंग्लंड व अमेरिका ह्या देशांतील तज्ज्ञांना मर्यादित मुदतीसाठीं कामावर नेमीत असते. अमेरिका व इंग्लंड ह्या देशांत संरक्षणखात्यासाठीं व अन्यत्र लागणारी जी यंत्रसामग्री तिचें उत्पादन खाजगी कंपन्यांकडून कंत्राटानें करून घेण्यांत येतें.

" मी १९०८ सालीं झारशाहीच्या अमदानींत रशियांत गेलों होतों. त्या वेळीं तेथील कारखान्याचे व्यवस्थापक व प्रमुख अधिकारी इंग्लिश अगर जर्मन असत. परंतु पंचवार्षिक योजनांच्या द्वारें सोव्हिएत् सरकारनें आपल्या देशांतील माणसांना शिक्षण देवून उद्योगधंदे वाढविण्याचे खूप प्रयत्न केले. आतां यांत्रिक एंजिनिअरिंगच्या क्षेत्रांत व अणुशक्ति-उत्पादनाच्या अगदीं आधुनिक क्षेत्रांत देखील अमेरिकेशीं व इतर कोणत्याहि देशाशीं स्पर्धा करण्यास तो देश समर्थ बनलेला आहे. "

हिंदी एंजिनियरांच्या 'सिव्हिल एंजिनिअर्स ॲसोसिएशन' ह्या संस्थेनें भाक्रा-धरणाच्या प्रगतीसंबंधीं भारत-सरकारला सादर केलेल्या अहवालांत देखील औद्योगिक योजनांच्या बाबतींत परकीय तज्ज्ञांवर प्रमाणाबाहेर भिस्त टाकण्याच्या सरकारच्या धोरणाविषयीं तीव्र असंतोष प्रकट केलेला आहे.



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## हिंदी राज्यघटनेच्या
### ३१ व्या कलमाच्या दुरुस्तीसंबंधीं वाद

ता. १३ डिसेंबर १९५४ रोजीं कलकत्ता येथें असोसिएटेड चेंबर ऑफ कॉमर्सच्या वार्षिक सभेच्या उद्घाटन-प्रसंगीं भारताचे अर्थमंत्री श्री. चिंतामणराव देशमुख ह्यांचें भाषण झालें. ह्या संस्थेच्या व्यासपीठाला एक परंपरा आहे. भारताच्या अर्थव्यवस्थाविषयक धोरणाची नांदी ह्या व्यासपीठावरून गायिली जाते असा समज दृढमूल झालेला आहे. जवळजवळ त्याच सुमारास पं. जवाहरलाल नेहरू ह्यांनीं 'समाजवाद हेंच भारताच्या अर्थव्यवस्थेच्या विकासाचें अंतिम साध्य रहाणार' अशी घोषणा केलेली असल्यामुळें, उद्योगपतींचेंच नव्हे तर हिंदी अर्थशास्त्राच्या अभ्यासकांचें लक्ष श्री. देशमुख ह्यांच्या भाषणाकडे लागणें स्वाभाविक होतें. परंतु अर्थमंत्र्यांच्या भाषणावरून सरकारच्या धोरणांतील डळमळीतपणा, अनिश्चितता व नजीकच्या उद्दिष्टाबाबत स्पष्टतेचा अभाव मात्र उघड झाला असें म्हणावें लागतें.

हिंदी राज्यघटनेच्या ३१ व्या कलमांत सुधारणा करण्याचा सरकारचा निर्णय जाहीर झाला तेव्हांपासून भारतांतील बड्या उद्योगपत्तींनीं हाय खाल्ल्याचा देखावा सुरू केला. वास्तविक खाजगी मालमत्ता विनामोबदला राष्ट्रीय मालकीची न करण्याच्या तत्त्वाला विद्यमान राज्यकर्ते जोंपर्यंत चिकटून रहात आहेत, तोंपर्यंत ३१ व्या कलमांत होणाऱ्या संभाव्य दुरुस्तीनें त्यांच्या हृदयांत नवी काळजी उत्पन्न होण्याचें कांहींच कारण नाहीं. परंतु घटनेमधील प्रस्तुतच्या ३१ व्या कलमाच्या कक्षेविषयीं त्यांच्या ठिकाणीं बराच गैरसमज प्रचलित असल्याचें दिसून येतें. उदाहरणार्थ, त्या कलमान्वयें सरकारला प्राप्त झालेल्या अधिकाराविषयीं मुंबईच्या 'कॉमर्स' पत्रानें पुढील विचार व्यक्त केलेले आहेत : "सार्वजनिक कामासाठीं व जनतेच्या हितासाठीं कोणतीहि मालमत्ता ताब्यांत घेण्याचा अधिकार सरकारला आजहि आहे. परंतु त्याला दोन पायबंद आहेत : (१) ज्याचा हक्क नष्ट झालेला असेल त्याला सरकारला योग्य मोबदला द्यावा लागेल. (२) मोबदल्याच्या प्रमाणाविषयीं वाद उत्पन्न झाल्यास मालमत्तेस मुकलेल्या व्यक्तीला न्याय-कोर्टाकडे दाद मागतां येईल. संभाव्य दुरुस्तीचा उद्देश, मध्यवर्ती सरकारलाच नव्हे तर राज्यसरकारांनादेखील कोणाहि व्यक्तीची, कंपनीची अगर भागीदारीची मालमत्ता नाममात्र मोबदला देऊनहि हिरावून घेण्याचे अधिकार द्यावेत व संबंधित व्यक्तींना अगर संस्थांना मोबदल्याच्या न्याय्यान्याय्यतेबद्दल घटनेचा भंग झाला ह्या सबबीवर दाद मागतां येऊं नये, अशी तरतूद करण्याचा आहे." वास्तविक 'कॉमर्स'चें हें मत वस्तुस्थितीला धरून नाहीं. घटनेच्या ३१ व्या कलमाच्या दुसऱ्या पोटकलमान्वयें मालमत्ता ताब्यांत घेण्यासाठीं सरकारला कायदा करावा लागेल आणि सरकारनें केलेल्या अशा कोणत्याहि कायद्यांत मोबदल्याची रक्कम निर्दिष्ट केलेली असावयास पाहिजे अगर तो मोबदला कोणत्या तत्त्वावर ठरवावयाचा तीं तत्त्वें व पद्धति ग्रथित करण्यांत आलीं असलीं पाहिजेत. वरील दोन अटी पाळल्या जात असतील तर सरकारनें द्यावयाचा मोबदला नाममात्र असावयास घटनेच्या वरील कलमाची आडकाठी येणार नाहीं. मात्र कायद्यानें देऊं केलेल्या मोबदल्याचें स्वरूप केवळ काल्पनिक असतां कामा नये.

सरकार करूं इच्छीत असलेल्या दुरुस्तीचें समर्थन करितांना श्री. देशमुख आपल्या उपरिनिर्दिष्ट भाषणांत म्हणतात :

"मला असें समजतें कीं, सर्वोच्च न्यायालयाच्या अलीकडील निवाड्यामुळें मालमत्ताविषयक हक्काला कायद्यानें मर्यादा घालणें म्हणजे मालमत्ताविषयक हक्क सक्तीनें ताब्यात घेणें असें समीकरण बसविण्यांत आलें आहे व अशा कोणत्याहि कायद्यांत मोबदल्याची तरतूद करण्यांत आली असली पाहिजे व सरकारनें मोबदला दिला पाहिजे. घटनेचें ३१ वें कलम ग्रथित करितांना घटनाकाराच्या मनांत खाजगी मालमत्तेला इतकें महत्त्व देण्याचा मानस असावा किंवा नाहीं ह्याबद्दल मी साशंक आहे."

श्री. देशमुख ह्यांच्या वरील म्हणण्यांत तथ्यांश असला तरी मालमत्ताविषयक हक्क मर्यादित करणाऱ्या कोणत्याहि कायद्यांत नाममात्र मोबदल्याची तरतूद करण्यास सरकारला प्रस्तुतच्या ३१ व्या कलमाच्या दुसऱ्या पोट-कलमामुळें कोणतीहि अनुल्लंघनीय अडचण येईल अशी भीति बाळगण्याचें वास्तविक कांहीं कारण नाहीं. घटनेच्या एकतिसाव्या कलमाच्या दुरुस्तीसंबंधीं बडे उद्योगपति व सरकार ह्यांच्यामधील हें भांडण,



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सरकार आपल्या हातीं घेऊं पहात असलेल्या अधिकाराबद्दल जास्तीत जास्त मोबदला मिळविण्या-साठीं, उद्योगपतींकडून पिकविण्यांत येत असावें अशी शंका आल्यावांचून रहात नाहीं.

– कृ. ना. फडके

---

## ' टिटोवाद ' म्हणजे काय ?

युगोस्लाव्हिआचे अध्यक्ष मार्शल टिटो यांनीं नुकतीच डिसेंबरच्या दुसऱ्या पंधरवड्यांत भारताला भेट दिली असून भारताच्या धोरणाबद्दल त्यांनी प्रशंसोद्गार काढले आहेत. – मार्क्सवादी टिटो यांचा स्टॅलिनशीं कसा बेबनाव झाला व त्यांनीं आपल्या युगोस्लाव्हिआमध्यें सामाजिक-आर्थिक स्वातंत्र धोरण कसें आंखलें या-संबंधीं श्री. **प्रभाकर पाध्ये** यांनीं 'केसरी' (१९।१२।५४) मधील आपल्या लेखांत विवेचन केलें आहे. तें या निमित्तानें उद्‌बोधक वाटेल. ते म्हणतात :

" युगोस्लाव्ह नेत्यांनीं समाजरचनेचा एक नवाच उपक्रम चालविला आहे. युगोस्लाव्हियांतले उद्योगधंदे खाजगी मालकीचे नसतात. सोव्हिएट रशियाप्रमाणें त्यांचें राष्ट्रीयीकरण करण्यांत आलेलें आहे. पण ते कामगारांनीं चालविलेले असतात. रशियाप्रमाणें ते एखाद्या सरकारी खात्याकडे अगर व्यवस्थामंडळाकडे दिलेले नसतात. युगोस्लाव्हियांत एखाद्या कारखान्याची अगर गिरणीची व्यवस्था कामगार-मंडळाकडे असते. हें मंडळ कामगारांनीं निवडलेलें असतें आणि कारखाना चालविण्याची कायदेशीर जबाबदारी त्यांच्याकडे सुपूर्त केलेली असते. त्या कारखान्यांत तयार होणाऱ्या मालाच्या किंमती, कामगारांचे पगार इत्यादि सर्व गोष्टी ठरविण्याचें स्वातंत्र्य कामगार-मंडळास असतें. आपला माल कोठेंहि विकण्याची मुभा त्याला असते. सरकार अर्थात् कर बसवते व या कराच्या उत्पन्नांतून सरकार आपला खर्च चालवितें. नवे कारखाने काढण्याचा व जुने न चालणारे बंद कर-ण्याचा अधिकार सरकारकडे असतो.

" सरकार ज्या कायदेमंडळास जबाबदार असतें तें कायदेमंडळ सर्वसाधारण नागरिकांनीं त्याचप्रमाणें उत्पादकांनी, म्हणजे कामगार, शेतकरी इत्यादि श्रमि-कांनीं निवडलेलें असतें, राष्ट्राच्याप्रमाणेंच राज्याचें आणि स्थानिक घटकांचें कायदेमंडळ या पद्धतीनेंच निवडलेलें असतें.

युगोस्लाव्हियांतील समाजरचनेची व राज्यपद्धतीची उभारणी विकेंद्रीकरणावर कशी झालेली आहे याची कांहींशी कल्पना यावरून येईल. ही पद्धति सरधोपट नाहीं. सोपीहि नाहीं. तिची अंमलबजावणी गुंतागुंतीची आणि कटकटीची असते; पण लोकांचें, लोकांसाठीं आणि लोकांनीं चालविलेलें राज्य ही लोकशाहीची व्याख्या या पद्धतीला अधिक लागू पडते हें उघड आहे. या पद्धतीची सर्वांगीण चर्चा करण्यास येथें अवकाश नाहीं, पण समाजरचनेचा हा प्रयोग नवीन आहे, अपूर्व आहे आणि क्रांतिकारक आहे हें नाकारतां येणार नाही.

" ' टिटोवाद ' असा याचा गौरव करण्यास हरकत असूं नये. पण टिटोंना त्याचें इतकें महत्त्व वाटत नाहीं. याचें एक कारण महत्त्वाचें असें दिसतें कीं, टिटोंचा स्टालीनशीं बेबनाव झाला तो या अगर अशा वैचारिक मुद्दयावर नव्हे. स्टालीननें टिटोंना आपला हस्तक, आपल्या इच्छेचा गुलाम म्हणून वागविण्यास सुरवात केली म्हणून हा बेबनाव झाला. स्टालीनशीं लढा करतांना आपण एखाद्या नव्या वैचारिक अधिष्ठानावरून झगडतों आहोंत अशी टिटोंची भूमिका कधी नव्हतीच. स्टालीननें आपलें परराष्ट्रीय धोरण युगोस्लाव्हियावर लादण्यास सुरवात केली, पूर्वयुरोपच्या आपल्या आर्थिक आंखणींत युगोस्लाव्हियाला दुय्यमतिय्यम – 'लाकुड-तोड्याचें आणि पाणी-वाहका'चें स्थान दिलें, युगोस्लाव्हि-याची आर्थिक पिळणूक सुरू केली, आणि सर्वांत कहर म्हणजे युगोस्लाव्हियाच्या युद्धकालीन कर्तबगारीचा अधिक्षेप केला. म्हणून हा बेबनाव सुरू झाला. समाज-वादी, मार्क्सवादी राष्ट्रांत स्नेह आणि समता असली पाहिजे, एकमेकांच्या गरजांची आणि इच्छांची कदर झाली पाहिजे, सोव्हिएट रशिया बडा असला तरी त्यानें छोट्या मार्क्सवादी राष्ट्रांवर कसली बळजबरी करतां कामा – नये ही टिटोची भूमिका स्टालीननें पायाखालीं ठोकरण्यास सुरवात केली म्हणून हें भांडण पेटलें. पण भांडण चांगलें भडकल्यानंतरहि टिटो आणि त्यांचे सहकारी, आपण मार्क्स-लेनिन-स्टालिनच्या सिद्धान्ता-प्रमाणें वागणार अशी द्वाही मिरवीत होते.

पण पुढें भांडण भडकतच राहिलें आणि त्यांतूनच वैचारिक शुद्धि आणि स्वतंत्रता यांचा जन्म झाला. ज्या



अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अर्थी सोव्हिएट रशिया साम्राज्यवादी वृत्तीनें वागतो त्या अर्थी त्याच्या समाजवादांत कांहीं तरी दोष असला पाहिजे आणि आपण आपला समाजवाद या दोषापासून अलिप्त राखला पाहिजे या बुद्धींतून या दोषाचा शोध सुरू झाला, आणि मग रशियांत समाजवाद नाहीं, तर सरकारी भांडवलशाही आहे, तेथें नोकरशाही माजली आहे, सत्ता आणि संपत्ति यांचें केंद्रीकरण झालें आहे वगैरे सिद्धान्त निर्माण होऊं लागले. म्हणजे वैचारिक मतभेदांतून रशियाशीं बेबनाव झाला असें नव्हे तर बेबनावांतून वैचारिक मतभेद आले. मला वाटतें, यामुळेंच या वैचारिक मतभेदांना द्यावें तितकें महत्त्व दिलें जात नाहीं."

---

पत्रव्यवहार

## एक बोलीचा महाराष्ट्र

लेखभाषा व बोलभाषा यामधील अंतर कमी झालें पाहिजे, शक्य तितकी सोपी भाषा वापरण्यांत आली पाहिजे म्हणून मी आतांपर्यंत अनेक लेख लिहिले आहेत. साहित्यपरिषदेनें सोपी भाषा वापरलेल्या पुस्तकांना बक्षिसें द्यावींत असा ठराव उमरावतीच्या संयुक्तमहाराष्ट्रपरिषदेच्या अध्यक्षपदावरून मी मांडला होता. तो पास झाला. पण त्याकडे वर्तमानपत्रांनींहि द्यावें तसें लक्ष दिलें नाहीं.''

**डॉ. ग. वा. तगारे** यांनीं 'नवभारता'च्या सेप्टेंबरच्या अंकांत '**बहुजनसमाजाचें भाषिक धन**' हा लेख लिहून समाजांतील वरच्या थरापुढें पुनः तो प्रश्न ठेवल्यामुळें आनंद झाला. जवळजवळ हेच विचार मी याच महिन्याच्या एका साप्ताहिकांत दिले होते. माझी विनंति विशेषेंकरून ब्राह्मणजातींतील साहित्यिकांनाच होती. कारण आज वरच्या दर्जाचे लेखक जास्त आहेत ते त्याच जातींत. विद्वानांची संख्याहि जास्त आहे ती त्याच जातींत. बहुजनसमाजाला शिकवण्याचें आणि शाहणे करण्याचें काम त्यांनाच अधिक चांगलें करतां येणार आहे. म्हणून माझ्या मित्रगणांपैकीं महाराष्ट्रांतील नामवंत साहित्यिकांना व पंडितांना मी नेहमीं आग्रह करीत आलों आहे कीं 'तुमचे अलंकार, कोट्या आणि जाडे संस्कृत शब्द प्रयत्नानें कमी करा. संस्कृतासारखी अवघड भाषा तुम्ही थोड्याशा प्रयत्नानें आपलीशी करूं शकतां आणि आपल्यापैकीं कांहीं थोडे बोलूंहि शकतात. मग मराठी भाषा अभ्यासानें बहुजनसमाजाला समजेल अशी वापरण्याला कां शिकत नाहीं ? यांत तुम्हांला न झेपण्याजोगें आणि न पचण्याजोगें असें काय आहे ? यांत ज्या मानान तुम्ही यश मिळवाल त्या मानानें खालच्या समाजाजवळ जाल. त्यांचें प्रेम मिळवूं शकाल. तुमचे विचार, तुमचा जिव्हाळा त्यांच्यापर्यंत पोहोंचूं शकेल. त्यांचें पुढारीपण तुमच्याकडे चालत येईल. तुम्ही असा कसोशीनें प्रयत्न केल्यास, महाराष्ट्रांतील ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद नाहींसा होत जाईल. संयुक्त महाराष्ट्राला त्याची आज फार फार जरूरी आहे.'

डॉ. तगाऱ्यांचा 'नवभारत'मधील लेख मी अगदीं हावरेपणानें वाचला. अगदीं माझ्या जातीचेच ते आहेत. माझेच विचार मला त्यांच्या लेखणींतून उतरलेले वाचून आनंद झाला. त्यांतहि ते ब्राह्मण असल्यामुळें विशेष आनंद झाला. विचार माझे, मला आवडणारे, जे पाहिजे ते होतें खरें. पण भाषा त्यांचीच होती. सोपं लिहा म्हणून जड भाषेंतच लिहिलं होतं !

मला याहून दुःख होतं तें आमच्या मराठादि बहुजनसमाजांतील होतकरू लेखकांचं लिखाण पाहून. तेहि वरच्यांचें अनुकरण करतात आणि सोपी भाषा ही येत असतांना, वरच्या जोडींत जावें म्हणून तिला उगाच नटवूनथटवून बोजड करतात. अस्पृश्य मानलेल्या जमातींतला विद्यार्थी बी. ए., एम. ए. पीएच्. डी. झाला कीं आपला महारवाडा-मांगवाडा टाकून वरच्यांत रहायला जातो. आपल्या लोकांत बरोबरीच्या नात्यानें वागणं, बोलणं, मिसळणं त्याला कमीपणाचं वाटतं. तसं आमच्या लेखकांना आपल्या मायबोलीची लाज वाटूं लागते व पंडिताच्या भाषेचें ते अनुकरण करूं लागतात. खालच्या समाजाला समजेल असें भाषेचें स्वरूप असावें. याचा अर्थ ती वेडगळ असावी, अश्लील असावी असा मुळींच नाहीं. सर्वसाधारण समाजांत वापरली आणि समजली जाणारी भाषा असली म्हणजे झालें. सानेगुरुजींची व विनोबांची भाषा या दृष्टीनें मी आदर्श मानतों. बोलायचं तसं लिहायचं हें ठरवलं कीं मग अनुस्वाराचं आपोआपच उच्चाटन होईल. तसंच अलंकार आणि कोट्यांखेरीज भाषेची पकड मनावर बसत नाहीं असं थोडंच आहे !









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भार्षेत जिव्हाळा असला कीं इतर गोष्टीला खरोखरीं कांहीं महत्त्व नाहीं.

मराठा बोलीचा सलग भाग झालाच पाहिजे हा आमचा आग्रह आहे. मग त्या बोलींतलाहि अलगपणा आपल्याला काढायला नको काय ? त्याखेरीज एकजिनसी महाराष्ट्र कसा निर्माण होईल ? महाराष्ट्र खरा बलवान् व्हायचा तर त्यांतील जातिभेद नष्ट करायला पाहिजेत. जातीजातींतील उच्चनीचभेद गेले पाहिजेत, तसेच भाषेंतील उच्चनीचभेद करतां येतील तेवढे कमी केले पाहिजेत.

— माधवराव बागल

## कोंकणी बोलणाऱ्यांची संख्या

[ '**कोंकणीचें भवितव्य**' या शीर्षकाखालीं श्री. श्रीपाद जोशी यांचा एक लेख 'नवभारता'च्या गेल्या डिसेंबरच्या अंकांत आला आहे. त्या लेखांतील कांहीं आंकड्यांच्या सत्यतेबद्दल आक्षेप घेणारें पत्र मुंबईचे श्री. श्री. रा. टिकेकर यांच्याकडून आलें. श्री. टिकेकर यांचे आक्षेप श्री. जोशी यांना कळविले. श्री. जोशी यांनीं त्या आक्षेपांना उत्तरें दिलीं आहेत. श्री. टिकेकर यांचें पत्र व त्याला श्री. श्रीपाद जोशी यांनीं दिलेलें उत्तर दोन्हींहि पुढें दिलीं आहेत.– का. सं. ]

संपादक 'नवभारत', पुणें यांस—

सा. न. वि. वि.

श्री. श्रीपाद जोशी यांनीं सुरवातीसच दोनदां आपल्या 'अ-शास्त्रीय'पणाची कबुली दिली हें एका परीनें बरें झालें. पण ते 'अ-सत्य' लिहितील असें वाटलें नव्हतें. निदान आंकडेशास्त्रांबाबत तरी त्यांची विधानें इतकीं भोंगळ असतील ही कल्पनाच करवत नव्हती. पण प्रत्यक्ष अनुभव निराळा आला.

पहिली बाब : "**कोंकणी बोलणारे पस्तीस लाख**", हें स्वप्नरंजन आहे कीं काय ? शिरगणतीच्या हिशेबाप्रमाणें कोंकणी मातृभाषा असणारांची ( अखिल भारतीय ) संख्या सहा लाख एकोणचाळीस हजार वीस (६,३९,०२०) इतकी आहे. शिरगणतीबाबत थोडासा गोंधळ पंजाब, पेप्सू, दिल्ली व हिमाचलप्रदेश या टापूंत झाल्याचें अहवालाच्या सुरवातीस नमूद केलें आहे. कोंकणी मातृभाषा असणारांच्या प्रदेशांत नव्हे. तेव्हां प्रश्न असा कीं कुणावर अधिक विश्वास ठेवावा ?

दुसरी बाब : – "**साडेतीन कोटी मराठी बोलणारे**" त्यांनीं आणले कुठून ? शिरगणतीच्या अहवालांत ही संख्या दोन कोट सत्तर लाख साडेएकोणपन्नास हजार बावीस (२,७०,४९५२२) अशी आहे. कदाचित् असा आक्षेप घेतां येईल कीं यांत भारताबाहेर असलेल्या मराठी भाषिकांची संख्या धरली नाहीं. तो आक्षेप खरा असला तरी मराठी बोलणारांची जागतिक संख्या साडेतीन कोट कशी होते ?

तिसरी बाब : "**कोणत्याहि पुस्तकाच्या हजार-बाराशें प्रती निश्चित खपतील असें कोणाला सांगतां येत नाहीं**" – ही मराठी प्रकाशनाची अवस्था अतिरंजित आहे खास. नाहींतर धाडसी प्रकाशक नव्या दमानें पुढें आलेले दिसले नसते; प्रकाशनाचा धंदा आपल्या मराठीबाबत चाललाच नसता. दहा हजारांवर प्रती खपलेलीं किती पुस्तकें श्री. जोशी यांना ठाऊक आहेत ? त्यांचे कशानें – कोणत्या आधारानें, कोणत्या हिशेबानें समाधान होईल ? – कळावें हे वि.

मुंबई, ३–१२–५४ **– श्री. रा. टिकेकर**

---

श्री. संपादक 'नवभारत' यांस

स. न. वि. वि.

श्री. टिकेकर यांच्या पत्रांतील विधानांना उत्तर देण्याची संधि आपण मला दिली याबद्दल मी आपला आभारी आहे. वस्तुतः श्री. टिकेकर यांचे आक्षेप तांत्रिक असून मी जे मुद्दे मांडले आहेत त्यांच्यावर त्यांच्या या आक्षेपांचा कांहींहि परिणाम होत नाहीं. तरीपण आपल्या इच्छेस मान देऊन पुढील खुलासा करीत आहे :

### कोंकणी बोलणाऱ्यांची संख्या

"१८९१ तले भाशीक गणते वैल्यान, दक्षीण कोंकणातल्या कोंकणी उलैतल्यांलो आंकडो १५,६५,३९१ आसलो"[1] हे भाशेक डॉ. ग्रियर्सन खरेली कोंकणी (True Konkani) म्हणतात.[2] दर धा वर्सांनीं धा

---

1 Grierson, L. S. I. Vol. 7, p. 3

2 ,, ,, ,, 1 pt. 1, p. 143






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

टक्के वाडल्यार, ५० वर्सांनी मृळयार १९४१ त हो आंकडे सुमार २५ लक्षांचेर पावंक जाय. खरेले कोंकणिचे उत्तरेक बाणकोटी आनी संगमेश्वरी कोंकणी आसून १८९१ त तिचो आंकडो १३,३४,५८७ आसलो. ही कोंकणी खरेले कोंकणीक चड जमता खें. ह्या ५० वर्सांत धा टक्यांच्या हिशेबान हो आंकडो सुमार २१ लक्षांचेर पावंक जाय. हे तरेन, खरेली कोंकणी आनी तिका जमतली बाणकोटी आनी संगमेश्वरी मेळून कुल्ली आंकडो सुमार ४६ लक्ष जाता. बाणकोटाचे उत्तरेक दमणगंगे मेरेन १८९१ त उत्तर कोंकणिचो आंकडो १०,१६,२३० आसलो. तो ह्या ५० वर्सांत धा टक्यांच्या हिशेबान सुमार १६ लक्ष जावंक जाय. म्हणटकूच, दमणगंगेसाकून सगळ्या कोंकणांतल्या कोंकणी उलैतल्यांलो कुल्ली आंकडो सुमार ६२ लक्ष जाता. " तरीपण —

"तुर्तांक उत्तर कोंकणी कुशीक दवडून, डॉ. ग्रियर्सनांले तर्करिती भाशेन, **खरेले कोंकणिचीच येवजणी केल्यार, ती उलैतल्या लोकांलो आंकडो आज २५ लक्ष आसा.'**

[ कोंकणी परिशद – तिसरी बसका, येवकार – अध्यक्षां लें उलोवप कै० शणै गोंयबाब (श्रीवालावलीकर), पृष्ठ ४२-४३ ]

हा आंकडा १९४१ चा आहे. त्यांत गोव्याची खानेसुमारी धरलेली आहे. ती धरून दहा वर्षांतील वाढ ध्यानीं घेतल्यास ३५ लाख हा आंकडा बरोबर आहे हें कळून येईल.

### मराठी भाषिकांची संख्या

साडेतीन कोटी ही संख्या मराठी भाषिकांची नसून [ संयुक्त महाराष्ट्र परिषदेनें राज्य पुनर्घटना समितीपुढें सादर केलेल्या अहवालाप्रमाणें ( पानें ३९–४३ ) ] संयुक्त महाराष्ट्राची आहे. ' साडेतीन कोटी ' ऐवजीं पावणेतीन कोटी मराठी भाषिक आहेत असें म्हटलें पाहिजे, हें खरें.

### मराठी पुस्तकांचा खप

मराठींतील उत्कृष्ट खप असणारे विख्यात लेखक प्रा. ना. सी. फडके ' हा मराठीचा संसार ! ' या लेखांत म्हणतात :

" ज्या मराठी लेखकाचीं पुस्तकं सगळ्यांत जास्ती वाचलीं जातात, त्याच्या नव्या पुस्तकाची आवृत्ति दोन हजारांच्या घरांत असते. ही खपायला तीन ते पांच वर्षे लागतात ... ही झाली सर्वांत लोकप्रिय असलेल्या लेखकाच्या नव्या पुस्तकाची कहाणी. "

[ ' महाराष्ट्र साहित्य पत्रिका ' जुलै – ऑगस्ट – सप्टेंबर १९५४, पान ६ ]

— श्रीपाद जोशी

---

## पुस्तक-परामर्श

**वैदिक–शाङ्कर–अद्वैतमतानुवाद ( अर्थात् ) प्रस्थानत्रय-भाष्याचा उपसंहार**–लेखकः आचार्यभक्त द. वा. जोग उपनिषत्तीर्थ. प्रकाशक : श्री. बा. ल. पाठक, मुंबई २ ( १९५४ ). पानें ९२९ किंमत १५ रु.

परतत्त्वदर्शन, परमार्थसाधना व जीविताची इतिकर्तव्यता यासंबंधीं फार मोठी विचारसंपदा मानवजातीनें निर्माण केलेली आहे. तिच्यांतील विचाराची सखोलता व विविधता यांचा विचार करतां भारतीय विचारविश्वाचें स्थान फार मोठें आहे. प्राचीनतम काळींच निश्चित झालेलीं बीजतत्त्वें अनेक दर्शनांच्या रूपानें विस्तारून भारतीय दर्शनशास्त्राचा भव्य प्रपंच थाटला गेला आहे. विश्वाच्या बुडाशीं ब्रह्मरूपी एकच एक सत्ता आहे व जीवाची या ब्रह्माशीं अभिन्नता आहे हा विचार आपल्या दर्शनविश्वाचा आधारस्तम्भ आहे. शंकराचार्यांच्या अद्वैतदर्शनांत ह्या विचाराचें उत्कट, तर्कप्रतिष्ठित व एकसंध रूप आपल्याला पहावयास मिळतें. साहजिकच या दर्शनाचें सर्वांगीण व यथार्थ ज्ञान करून देणारा प्रस्तुत ग्रंथ[४] " **वैदिक-शाङ्कर-अद्वैतमतानुवाद** "

---

3 Grierson, L. S. I. Vol. 1, pt. I, p. 143

४ आचार्यभक्त द. वा. जोग यांचा प्रस्तुत ' **वैदिक-शाङ्कर-अद्वैतमतानुवाद** ' या ग्रंथाचें प्रकाशन म. म. द. वा. पोतदार यांच्या हस्तें पुणें येथें १२।१२।५४ रोजीं झालें. हा ग्रंथ श्री. जोग यांनीं प्रा. र. दा. करमरकर यांना अर्पण केला आहे. प्रकाशनसमारंभांत भाषण करतांना प्रा. र. दा. करमरकर यांनीं ' हा ग्रंथ पीएच्. डी. देण्याच्या लायकीचा आहे ' असा त्याचा गौरव केला. संकेश्वर-करवीर-मठाचे श्रीशंकराचार्य यांनीं श्री. जोग यांना या ग्रंथाच्या निमित्तानें ' **अद्वैतवेदान्तालंकार** ' ही पदवी दिली आहे. पुणें येथील मध्वसंप्रदायी श्री. नागाचार्य



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणजे तत्त्वजिज्ञासूंना एक अमोल देणगीच आहे. विषयाच्या गौरवाला अनुरूप अशा प्रौढ, प्रसन्न व विशद विवेचनशैलीनें लिहिलेला हा ग्रंथ अनेक वर्षांच्या निष्ठायुक्त ज्ञानतपस्येचें फळ आहे. म्हणूनच पुणें विद्यापीठाकडून व श्रेष्ठ पंडितांकडून ग्रंथकर्त्याचा यथोचित गौरव झालेला आहे. देशी व विदेशी भाषांतून अनुवादित होऊन या ग्रंथाची कीर्ति व उपयुक्तता एकसारखी वाढतच जाईल अशी आशा वाटण्यासारखीच ही रचना आहे.

एकंदर ग्रंथाचा विस्तार नऊशें पानांवर इतका मोठा आहे. 'ब्रह्मविचार', 'कार्य हें कारणाहून भिन्न नाहीं', 'अध्यासवाद', 'श्रीगौडपादाचार्यांचा कल्पनावाद' व 'मायावाद अर्थात् विवर्तद्वारा अद्वैतसिद्धि' हीं त्यांतील मुख्य पांच प्रकरणें ( २९५ पानें ) म्हणजे अद्वैतसिद्धान्ताचें समग्र दर्शन करून देणारा ग्रंथाचा गाभा आहे. यांतील विवेचन सर्वंकष आहे व सुगमहि आहे. त्यामुळें सर्वसामान्य जिज्ञासूंना व पंडितांनाहि तें उत्कृष्ट वाटेल. या मध्यवर्ती विवेचनाच्या आधारानें 'सृष्ट्युत्पत्ति–विचार', 'विदेहमुक्ति व जीवन्मुक्ति', 'जीवाचें उत्क्रमण व पुनरागमन' व 'आत्मज्ञानासाठीं श्रवणादि-साधनें' हीं महत्त्वाचीं चार प्रकरणें आलीं आहेत.

ग्रंथाच्या पूर्वार्धांतील बाकीच्या तीन प्रकरणांपैकीं 'वैदिक वर्ण व आश्रम' ( पानें ४१७–४३० ) या लहानशा प्रकरणाचें पारंपरिक दृष्टीनें महत्त्व व स्थान आहे. परंतु हा विषय समाजरचनाशास्त्राचा आहे व त्यामुळें प्रस्तुत प्रकरणांतील मांडणी आज सांप्रदायिक व म्हणून एकदेशीयच ठरणें अपरिहार्य आहे. 'परमतखंडन' ( ४६०-५२० ) या प्रकरणाबद्दलहि असेंच म्हणावें लागेल. सांख्य, वैशेषिक, बौद्ध, जैन, माहेश्वर आणि भागवत इतक्या दर्शनांचें खंडन करण्यासाठीं ग्रंथांतील फक्त ६० पानें आलीं आहेत. अर्थात् हें खरें कीं ग्रंथाचा प्रतिपाद्य विषयच फक्त अद्वैतदर्शन आहे. परंतु सांख्यादि इतर दर्शनांची खंडनपद्धतीनें अशी थोडक्यांत विल्हेवाट लागूं शकते असा एक अनाठायी अभिनिवेश वाचकांच्या मनावर ठसण्याचा यांत संभव आहे. ग्रंथकर्त्याची आचार्यभक्ति व संप्रदायनिष्ठा चांगलीच प्रखर असल्यामुळें माझ्यासारख्या सामान्य वाचकांच्या दृष्टीनें अभिनिवेशाचा हा धोका नमूद करणें मला इष्ट वाटतें. अद्वैतमत हें भारतीय विचारमंदिराच्या कळसाप्रमाणें आहे हें खरें. पण कळस म्हणजे सर्व मंदिर नव्हे. वैशेषिक, बौद्ध, जैनादि दार्शनिकांच्या सूक्ष्म विचारांमुळें व दीर्घ प्रयत्नांमुळें या मंदिराला भव्यता लाभलेली आहे. वैदिक विरुद्ध अवैदिक असा भेद मनांत वागवून, आणि बौद्ध-जैनादिकांचा शून्यवाद, अहिंसा, भिक्षुसंघ इत्यादि तत्त्वांमुळें व आचारांमुळें भारतीय दर्शनाला व समाजाला अवकळा प्राप्त झाली असें मानून, या भव्यतेचें दर्शन घडणार नाहीं. सांख्यदर्शन हेंहि या दृष्टीनें उपेक्षणीय नसून उलट तें भारतीय विचारमंदिराला पायासारखें आहे; आणि वैद्यकादि भारतीय विज्ञानशास्त्रांना तर सांख्यतत्त्वें प्राणभूतच आहेत. भागवतदर्शनाचें महत्त्वहि मध्ययुगीन संतांच्या प्रचंड भारतव्यापी प्रयत्नाची प्रेरणा म्हणून कोणासहि नाकारतां येण्यासारखें नाहीं. सारांश, 'परमतखंडन' या प्रकरणाचें महत्त्व अद्वैतमताच्या पुष्टीपुरतेंच मर्यादित आहे; तौलनिक अभ्यासाच्या दृष्टीनें सांख्यादि दर्शनांचें स्वरूप व महत्त्व या विवेचनांत आलेलें नाहीं. ग्रंथकर्त्यालाहि हीच मर्यादा अभिप्रेत असावी व ती थोडी स्पष्टपणें मी नमूद करीत आहे.

पूर्वार्धांतील उरलेलें तिसरें प्रकरण, 'पुरुषार्थाची अद्वैतपर मीमांसा' ( ५२१–५७७ ) हा एक महत्त्वाचा व स्वतंत्रपणें लिहिलेला विषय आहे. मानवी जीविताचें इतिकर्तव्य किंवा 'पुरुषार्थ' ह्या विषयाला आज युरोपीय तत्त्वज्ञानांतहि मोठें महत्त्व प्राप्त होत आहे. एकंदर मानवी संस्कृतीच्या भवितव्याबद्दल एक भयाकुल विवंचना पसरल्यामुळें 'पुरुषार्थ' किंवा 'मूल्य' यासंबंधीं विचाराकडे साहजिकच तत्त्वज्ञांचें लक्ष वेधलें गेलें आहे. अशा वेळीं पाश्चात्त्य मूल्यविचारांची ओळख करून देऊन त्या पार्श्वभूमीवर अद्वैतमतानुसार 'पुरुषार्थां'ची तौलनिक मीमांसा ग्रंथकर्त्यानें केली आहे. म्हणून हें प्रकरण मोलाचें झालें आहे.

जोशी यांनींहि या ग्रंथाचा गौरव केला आहे. पुणें विद्यापीठ, कोरगांवकर-धर्मदायसंस्था इत्यादि संस्थांनीं या ग्रंथाच्या प्रकाशनाकरितां आर्थिक साहाय्य दिलें आहे.








अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ग्रंथाच्या उत्तरार्धांत प्रस्थानत्रयीवरील भाष्याचें तपशीलवार विवेचन आहे. त्यांत गीताभाष्याच्या अनुरोधानें 'गीतारहस्यां' तील विवेचनावर ग्रंथकर्त्यानें मूलभूत आक्षेप घेतले आहेत. 'गीतारहस्या 'च्या निमित्तानें तत्त्वज्ञानाच्या चर्चेची केवढी लाट त्या वेळीं महाराष्ट्रांत उसळली होती ? 'कर्म', 'संन्यास', 'प्रवृत्ति', 'निवृत्ति' वगैरे तत्त्वांची छाननी करण्यास मोठमोठे व्यासंगी तत्त्वचिंतक सरसावले होते, व सामान्य सुशिक्षित मनुष्यहि त्या वेळच्या त्या वादांत केवढा रमून जात होता ? आजच्या तत्त्वजिज्ञासेच्या क्षीणतेच्या काळांत त्या वादळाची पुसट का होईना पण आठवण करून देणारे पडसाद या प्रकरणांत उमटलेले आहेत. आचार्य विष्णुशास्त्री बापट यांनीं लोकमान्यांच्या काळींच जे आक्षेप 'रहस्या'वर घेतले त्यांचें सूत्र धरून या ग्रंथांत ते आक्षेप स्पष्ट व विशद करण्यांत आले आहेत. लोकमान्यांच्या प्रज्ञेबद्दल पूर्ण आदर ठेवून आपले हे आक्षेप साधार व निश्चित असे मांडतांना सौजन्य व शास्त्रप्रेम यांचें दुहेरी अवघड पथ्य ग्रंथकर्त्यानें पाळलेलें आहे. गीतेला मोक्षशास्त्रीय ग्रंथ मानावयाच्या ऐवजीं नीतिशास्त्रीय ग्रंथ मानून 'योग' म्हणजे 'कर्मयोग' असें चुकीचें समीकरण लोकमान्यांनीं रूढ केलें आणि विहित कर्माचरण हें फक्त चित्तशुद्धीचें साधनच नव्हे तर अंतिम मोक्षप्राप्तीचें साधन आहे व ज्ञानोत्तरहि हें कर्माचरण आवश्यक आहे असें प्रतिपादन त्यांनीं केलें, हे आक्षेप मूलभूत स्वरूपाचे आहेत. आज माझ्यासारख्या जिज्ञासूंच्या दृष्टीनें 'रहस्य'संप्रदाय व 'आचार्य-' संप्रदाय यांच्यांतील प्रखर वादाच्या पलीकडे जाऊन या वादभूत विषयांची चर्चा व्हावयास हवी. त्या दृष्टीनें प्रस्तुत ग्रंथांत जी आक्षेपांची मांडणी केली आहे ती साधार असल्यानें अभ्यासकांना उपयुक्त ठरेल.

मराठी भाषेला प्रस्तुत ग्रंथानें एक मोठेपणा आणला आहे आणि हें सिद्ध केलें आहे कीं अद्वैतदर्शनाचें शास्त्रीय विवेचनहि सहज पेलण्याइतकें आपल्या भाषेचें सामर्थ्य आहे. ग्रंथकर्त्याच्या शास्त्रीय, सुबोध व सरल शैलीची साक्ष ग्रंथांतच मिळते. ह्या ग्रंथाचा उद्देश अद्वैतसिद्धान्ताचें प्रतिपादन हा असला तरी सर्वच भारतीय दर्शनांवरील व एकंदर दर्शनशास्त्रावरील मराठी ग्रंथनिर्मितीला या ग्रंथामुळें प्रेरणा लाभेल असा कोणासहि भरंवसा वाटेल. ग्रंथकर्त्याच्या दीर्घ खडतर ज्ञानतपस्येचें हें फल वाचकांच्या पदरीं पडण्याचें श्रेय प्रकाशकांनाहि आहे.

– दि. के. बेडेकर

---

**तुकारामभक्तीचा डांगोरा** ( तुकारामाचें भक्तिदर्शन ), अध्यात्म ग्रंथमाला पुष्प ५ वें, लेखकः श्री. ग. वि. तुळपुळे एम्. ए., सांगली.

या पुस्तकांत श्री. तुळपुळे यांनीं तुकारामांच्या समर्पक अभंगांचा आधार घेऊन साधकाच्या दृष्टीनें आरंभीं नित्यानित्यवस्तुविवेकादि साधनचतुष्टयाचें अत्यंत सुबोध विवेचन केलें आहे. हें साधनचतुष्टय वेदान्ताच्या अभ्यासकांना परिचित आहे; परंतु त्याचें सरस वर्णन तुकारामाच्या अस्सल अनुभवाच्या काव्यमय वाणींत जेव्हां वाचावयास मिळतें त्यावेळी मनाचें एक निराळेंच समाधान होतें. साधनचतुष्टयाचें विवेचन हा या पुस्तकाचा पूर्वार्ध. उत्तरार्धामध्यें तुकारामांनीं भक्तीविषयीं काय सांगितलें आहे याचा विचार आहे. नित्यानित्यवस्तूचा विवेक, वैराग्य, चित्तशुद्धि हीं प्राथमिक साधनें, नको तें सोडण्यास सांगणारीं होत. भक्ति हें रचनात्मक साधन आहे. ईश्वरप्राप्तीकरतां काय केलें पाहिजे हें त्यानें कळतें. मुमुक्षुत्व हें साधन, पहिलीं तीन व भक्ति यांस जोडणारा दुवा होय. याविषयीं संत हे आपले मार्गदर्शक. त्यांचा आदर्श पुढें ठेवून आपल्या आचारविचारांस वळण द्यावयाचें. सातव्या प्रकरणांत संतांचे स्वभावधर्म, त्यांचें आचरण, त्यांचें साधन, त्यांना मिळालेलीं भक्तीचीं फळें, त्यांचा व देवाचा संबंध इत्यादि गोष्टींचें, साधकास आवश्यक असलेलें ज्ञान, तुकारामांच्या अभंगांच्या द्वारें करून दिलें आहे.

संत हे देवाचे अनन्यभक्त. 'भूतीं भगवंत' या दृष्टीनें त्यांना स्वतःचें निराळेपण नाहीं. परोपकार आणि लोकोद्धार यांकरतां ते जीवन जगतात आणि भक्तीचा प्रसार करतात. अशा संतांवर देवाचें अनन्यप्रेम असतें. देव आणि भक्त यांच्या अन्योन्य प्रेमाला दुसरी तोड नाहीं. अशा भक्तीचीं साधनें नाम आणि सत्संग. "नामेंचि सिद्धि, नामेंचि सिद्धि" ; फक्त हें नाम निजनिष्ठेनें घेतलें पाहिजे. तेंच महत्त्व हरिकथेचें.



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

" प्रेम अमृताची धार । वाहे देवा ही समोर ॥ ऊर्ध्व-वाहिनी हरिकथा । मुगुटमणि सकळतीर्थां ॥ "

भक्तांना भक्तिमार्ग दाखविणें हें संतांचें जीवनकार्य. अशा सत्संगाचें महत्त्व आपल्या अध्यात्ममार्गांत फार मोठें मानलें आहे. आपल्या चिकित्सक बुद्धीलाही तें पटावें. लोकोत्तर पुरुषां·( Heroes )चें, विभूतींचें आणि विभूतिपूजेचें महत्त्व, कार्लाईल व इतर विचार-वंतांनीं वर्णिलें आहे. मनुष्येतर अशा चराचर सृष्टींतील अनेक वस्तूंची – वृक्षवनस्पति, नद्या, पर्वत, चंद्र-सूर्य, उषा, वरुण इत्यादींची आपण पूजा करतों, पाषाण-मय मूर्तींचा, देवाचें प्रतीक म्हणून अंगीकार करतों. तर प्रत्यक्ष आपल्या वाणीनें आणि आचारानें मोक्षमार्गाचें प्रवर्तन करणाऱ्या साधूचें मार्गदर्शन व सहवास यांपासून साधकाला श्रेयाची स्फूर्ति मिळावी यांत नवल तें काय ? 'साधकाची वृत्ति आणि आचरण' या नवव्या प्रकरणांत ' भाव तेथें देव ' याविषयीं मोठें उद्बोधक विवेचन आहे. बुद्धि आणि भावना यांचें मानसशास्त्रीय रूप स्पष्ट करून लेखकानें, भावनेंत जीवन बदलण्याचें सामर्थ्य कसें असतें, हें दाखविलें आहे. भक्तिदर्शनामध्यें हें प्रमेय अत्यंत महत्त्वाचें आहे. कारण साक्षात्कार हा बुद्धि आणि तर्क यांना गोचर नाहीं. तो अनन्य भावबळानें साधावयाचा आहे. संतांच्या शिकवणीनें, नामसंकीर्तनाच्या अभ्यासानें देहबुद्धि नाहींशी होते. भक्त सर्व प्रवृत्तींच्या पूर्ततेसाठीं देवाकडे धांव घेतो, त्याला शरण जातो, प्रेमानें त्याचें स्मरण व चिंतन करतो. देवाबद्दल त्याला निष्काम प्रेम वाटतें. सर्व कर्तृत्व देवाकडे आहे, तो दयेचा सागर आहे हें कळूं लागतांच प्रेम, आदर, कृतज्ञता, पूज्यभाव, भक्ति, शरणागति इत्यादि भावना एका देवाविषयींच उत्पन्न होतात. " तैसा मीवांचूनि कांहीं । आणीक गोमटेंचि नाहीं " अशी त्यांची वृत्ति होते. अशा अनन्य भक्तांची देव सेवा करतो, त्यांचा सांभाळ करतो.

भक्तीचें सर्वोत्तम फळ साक्षात्कार. याविषयीं दहावें प्रकरण आहे. या प्रांतांत स्वानुभवावांचून पाऊल टाकणें अशक्यप्राय आहे हें खरेंच. केवळ स्वसंवेद्य साक्षात्काराचें वर्णन कितीहि केलें तरी अपुरेंच पडावयाचें. तथापि परमात्मरूप अतर्क्य वस्तूशीं जे एकरूप झाले अशा ज्ञानेश्वरादि साक्षात्कारी संतांनीं जसे आत्मानंदाचे उद्गार काढले आहेत तसेंच वर्णन तुकारामांनींहि केलें आहे. अधिकार नसला तरी अशा लोकोत्तर आध्यात्मिक रसवृत्तीकडे आपलें अंतःकरण खेचलें जातें. कारण, आपणांस इतकें स्पष्ट दिसतें कीं, हे सर्व अनुभव अत्यंत प्रामाणिक, अंतर्मुख वृत्तीचे आहेत. ते समरसतेचे आणि आत्यंतिक आत्मनिष्ठेचे बोल आहेत. " तिळाएवढें बिंदुलें । तेणें त्रिभुवन कोंदलें ॥ न कळे दिवसराती । अखंड लागलीसे ज्योति ॥." बुद्धिवादी माणसानें याविषयीं विचारप्रवण व्हावें. साधूंच्या लक्षणांवरून, त्यांच्या बोलण्याचालण्यावरून जर आपणांस साधुत्वाची कल्पना येऊं शकते तर त्यांच्या स्वानुभवाच्या बोलांचें महत्त्व आपणांस वाटावें हें साहजिक आहे.

श्री. तुळपुळे यांनीं आपल्या ' निवेदना ' मध्यें प्रा. रा. द. रानडे यांच्या ( Mysticism in Maharashtra ) या ग्रंथाचा उल्लेख केला आहे. त्यांतील विवेचन साक्षात्काराविषयीं लक्षणीय आहे. बुद्धिवादाची पद्धति त्यांत अनुसरली असल्यामुळें तें वाचकास सुगम वाटेल. साक्षात्कार ( Rational Mysticism ) हें एक शास्त्र आहे. सर्व शास्त्रांमध्यें दिसून येणारी प्रवृत्ति म्हणजे ज्ञाताकडून अज्ञाताकडे (from the known to the unknown). अपूर्ण व सदोष याकडून पूर्ण, निर्दोष व निरामय सुखाकडे जाणें ही प्रवृत्ति स्वाभाविक आहे. उत्पत्ति, स्थिति, लय यांनीं मर्यादित असलेल्या पदार्थांचा परामर्श बुद्धीनें घेतां येतो. त्यांपासून मिळणारें सुखहि अपूर्ण, सदोष व विनाशी असतें हें उघड आहे. तेव्हां अविनाशी सुखाचा मार्ग कळण्यासाठीं साक्षात्कारी पुरुषांनीं सांगितलेल्या अध्यात्मशास्त्राकडे वळावें लागतें. वेदान्त व भक्ति यांचा समन्वय त्यांत दिसून येतो. आधुनिक साक्षात्कारशास्त्राच्या, ( Awakening ) जागृति, ( Purgation ) चित्तशुद्धि, मुमुक्षुत्व इत्यादि पायऱ्यांचा समावेश साधनचतुष्टयांत होतो. ही पूर्वतयारी. यानंतर नाम व सत्संग, साधकाची वृत्ति व आचरण यांचा विचार, Contemplation आणि Dark Night of the Soul या दोहोंमिळून होतो. या प्रत्यक्ष साधनाचें फळ साक्षात्कार. परमार्थाची शेवटची पायरी Illumination आणि Unitive life. आधुनिक साक्षात्कारशास्त्रामध्यें वर्णिलेल्या या सर्व पायऱ्या तुकारामां-



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

च्या अभंगाच्या आधारें श्री. तुळपुळे यांनीं अत्यंत व्यवस्थितपणें दाखविल्या आहेत. आपल्या सर्व संत-कवींनीं याच साक्षात्कारशास्त्राचें प्रणयन केलें आहे. अशा साक्षात्कारी पुरुषांची परंपरा सर्व कालांत, सर्व धर्मांत, सर्व देशांत आढळून येते. त्यांचा देश, त्यांचा काल, भिन्न असूनहि सर्वांनीं एकाच स्वरूपाचें सत्य सांगितलें आहे. त्यांनी सांगितलेल्या मार्गानें गेल्यास, हें सत्य समजून घेण्याची शक्ति मनुष्यामध्यें स्वभावतःच असल्यामुळें, तो आत्मानुभव निष्ठावंत साधकास कां येणार नाहीं. ? परंतु असा अभ्यासयोग साधण्याचा यत्किंचित् प्रयत्न न करतां किंवा त्या मार्गानें एकहि पाऊल न टाकतां, त्याविषयीं खरेंखोटें ठरविण्याचा अधिकार कोणासहि कसा प्राप्त होईल ? तेथें भक्तियोगाचेंच तंत्र अवलंबिलें पाहिजेः 'Contemplation is the technique of devotion'. श्री. तुळपुळे यांनीं तुकारामांच्या भक्तिदर्शनाचें विवेचन मुद्देसूदपणें, साधार आणि अत्यंत समरसतेनें केलें आहे.

——य. र. आगाशे

---

**साक्षात्कारपथावर तुकाराम अर्थात् तुकारामाचें आध्यात्मिक चरित्र**–लेखक व प्रकाशकः श्री. ग. वि. तुळपुळे एम्. ए. शिवाजीनगर, सांगली. ( १९५४ ) पानें २०८. किं. २ रु.

कोणतेंहि तुकारामाचें चरित्र घेतलें तरी त्यांत आध्यात्मिक जीवनाचा भाग प्रामुख्यानें येणार; परंतु साधकाच्या दृष्टीनें त्यांच्या आध्यात्मिक जीवनाचा स्वतंत्र व सूक्ष्म अभ्यास करणें केव्हांहि इष्टच होय. समर्पक अभंगांची निवड करून साधनचतुष्टयापासून साक्षात्कारापर्यंत भक्तिदर्शनाच्या सर्व पायऱ्यांचा आढळ कसा होतो हें 'तुकारामभक्तीचा डांगोरा' या ग्रंथांत दाखविलें, तर प्रस्तुत ग्रंथांत साक्षात्काराकडे प्रवृत्ति होण्याचीं मानसशास्त्रीय कारणें मुख्यत्वेंकरून सांगितलीं आहेत. मानवी जीवनांत निरनिराळ्या पातळीवर निरनिराळीं प्रेरकतत्त्वें ( urges ) दिसून येतात. खालच्या पायरीवर इंद्रियसुख, धन व कीर्ति, आणि उच्च पायरीवर ज्ञान, शुभाचार, कला —— सत्य, शिव, सुंदर हीं प्रेरक तत्त्वें प्रायः आढळून येतात. बहिर्मुख लौकिक जीवनांत 'सत्य-शिव-सुंदर' यांची उपासना कितीहि केली तरी त्यानें मनाचें पूर्ण समाधान होत नाहीं. जीवनाची अपूर्णता भासते. दुर्बलता, अज्ञान, दुःख, भय, चंचलता, ममत्व, अनित्यता इत्यादि दोषांपासून जीवन केव्हांहि मुक्त आहे असें वाटत नाहीं. म्हणून पूर्वोक्त दोषांपासून मुक्त असें – ज्यांत सामर्थ्य, ज्ञान, अखंड आनंद, निर्भयता, स्थैर्य, सर्वात्मता, अमृतत्व यांचा अनुभव घडेल अशी जीवनाची उत्कट मनीषा उत्पन्न होते. अशा जीवनपथिकांचें प्रवासवृत्त ( Pilgrim's Progress ) संतांनीं आत्मनिवेदनरूपानें वर्णिलें आहे. त्याचा भर मनावर, मनोजय आणि आत्मविकास यांवर. त्याचें फल अत्यानंद, स्वरूपसाक्षात्कार, देहात्मभावाचा निरास, 'तुका म्हणे अवघें दुमदुमलें देवें ।' असा सर्वात्मभावाचा अनुभव. साधकाच्या या मनोऽवस्थांचें सूक्ष्म अवलोकन केल्यास साक्षात्काराचें मानसशास्त्रच ( Psychology of Mysticism ) एक प्रकारें अवगत होईल.

आध्यात्मिक जीवनाचे आपले अनुभव तुकारामांनीं अभंगांमध्यें अत्यंत सूक्ष्मपणें वर्णिले आहेत. हें आत्मनिवेदन काव्यमय आहे. श्री. तुळपुळे यांनीं अशा अभंगाच्या द्वारें केलेलें विवेचनहि तसेंच मनोहर आहे. मनाची पहिली अवस्था म्ह० जाग्रति – प्रवृत्ति-परिवर्तन; रुळलेली लौकिक वाट सोडून नूतन मार्गानें जाण्याची तीव्र उत्कंठा व त्यामुळें भावनांचा प्रक्षोभ. Awakening ही पारमार्थिक जीवनाची पहिली पायरी. तुकारामांनीं जगाकडे पाठ फिरविली, देवाकडे तोंड वळविलें. यानंतर मुमुक्षा. 'कोण्या भावें देवा आतुडसी ?' अशी तळमळ. अजूनहि मधूनमधून लौकिकाची ओढ आहेच. म्हणून कठोर आत्मपरीक्षण–आत्मनिंदा. "मन माझें चपळ न राहे निश्चळ । घडी एकी पळ स्थिर नाहीं ॥", 'मजहूनी नष्ट आहे ऐसा कोण ' अशी धिक्काराची वाणी त्यांच्या तोंडून निघाली. आयुष्य पायाविण गेलें असें वाटून मन अनुतापानें दग्ध झालें. हें वादळ थोडें शांत झाल्यावर संतावांचून आपणांला कोणी तरून नेणारा नाहीं असें त्यांच्या लक्षांत आलें. नामस्मरण व नामसंकीर्तन हें ईश्वराची कृपा संपादन करण्याचें साधन. गुरुकृपेवांचून सोय नाहीं, हें संतसमागम आणि श्रवण यांपासून तुकारामांना कळून आलें. सद्गुरुरायानें कृपा करून



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नाममंत्र दिल्यानंतर, नाम आणि हरिकथा यांची महती अनुभवास येऊं लागली. "नाम घेतां कंठीं शीतल शरीर । इंद्रिया व्यापार नाठवती" ॥ " नकळे तें कळों येईल उगलें । " असा त्याचा प्रभाव.

अध्यात्ममार्गाच्या या सर्व वाटचालीमध्यें चित्त-शुद्धीचे प्रयत्न चालूच असतात आणि सत्संगतीमध्यें त्यांची वाढ होऊन नैतिक उन्नतीची पराकोटी गांठली जाते. यापुढील अवस्थेंत देवावरील भावाचा विकास होतो. 'प्रमसूत्रदोरी । नेतो तिकडे जातो हरी ॥' अशा या साधकदशेंत अंतःकरणावर आशानिराशेचे अनेक परस्परविरोधी भावनांचे तरंग उठत असतात. एक अवस्था पूर्णपणें संपते आणि केवळ पुढील मनोऽ-वस्था सारखी टिकून राहते असें नाहीं. कांहीं वेळां भक्ताचें सश्रद्ध मन विचलित होतें. तुकारामांनीं या सर्व गोष्टी अत्यंत प्रांजलपणें सांगितल्या आहेत. अंतःकरणाचा इतका सुंदर आविष्कार क्वचितच आढळे-ल. त्याला आध्यात्मिक मूल्य आहेच परंतु त्याचें काव्यसौंदर्यहि असाधारण आहे. त्यांत ' नामावीण माझी वाचा अमंगळ । ऐसा कां चांडाळ निर्मियेला ॥ ' अशी आत्मनिंदा आहे; ' दृढ माझें मन । येथें ठेवावें बांधून ॥ ' अशी प्रार्थना आहे; काकुळतीनें, लडिवाळ-पणानें, रागानें, आक्रोशानें, वैतागानें त्रागा करून, किंवा देवावर रुसूनहि देव दर्शन देत नाहीं असें पाहून तुकाराम म्हणतात : "नाहींतर नाहीं, आम्हाला तुझें दर्शन नको. आम्ही तें मागत नाहीं. तुझ्या मनांत असेल तेव्हां दे. तोंवर आम्ही तुझें नुसतें चिंतन करूं. तीहि एका अर्थानें तुझी भेटच आहे. ' शेवटची हे विनंति । पाय चित्तीं असावे ॥ ' "

असे आशानिराशेचे अनेकविध मनस्तरंग लेख-कानें आपल्या विवेचनांत फारच सुंदर रीतीनें दाखविले आहेत.

अशा आशानिराशेच्या आंदोलनांनीं व्याप्त झालेल्या अंतःकरणांत जीवात्म्याची अंधारी रात्र ( Dark Night of The Soul ) सुरू होते. पूर्वींच्याच सर्व भावना या अवस्थेंत अत्यंत उत्कटतेनें व्यक्त होतात. आशेची पूर्तता लांबणीवर पडली तर अंतः-करण अत्यंत व्यथित होतें. निराशेच्या वैतागांत, ' माझें लेखीं देव मेला । असो त्याला असेल ॥ ' असे उद्गार बाहेर पडतात. ' देवा, तूं निराशा केलीस म्हणून आतां मी माझ्या जीवाचा नाश करून तुझ्यावर हत्या घालीन', अशी सत्याग्रहाची भाषा बाहेर पडते. अर्थात् हा सर्व विरोधाभास आहे. त्याच्या मुळाशीं देवाविषयीं अनन्य निष्ठा आणि प्रेम आहे. या दोनहि प्रकरणांत तुकारामांच्या मनाची जी तळमळ व्यक्त होत आहे, ' अमृताची दृष्टी घालूनीयां वरी । शीतल हा करी जीव माझा ॥ ' किंवा ' वाटुली पाहतां शिणले डोळुले। दाविसी पाऊलें कै वो डोळां ॥' यांसारखी जी रसात्मकता आहे तिला दुसरी तोड नाहीं. ' अपि ग्रावा रोदित्यपि दलति वज्रस्य हृदयम् । ' अशा शब्दानीं त्याचें वर्णन केलें पाहिजे. लेखकांनीं केलेल्या वर्णनांतहि ही काव्यात्मता पूर्णपणें व्यक्त झाली आहे. प्रत्येक प्रकरण म्हणजे एक सुंदर प्रवचन आहे.

यानंतर निराशेच्या निबिड अंधारांतून उषः काल आला, साक्षात्काराचा सूर्योदय झाला. ' कोण पुण्य फळा आलें । तुझीं देखिलीं पाउलें ॥', 'अंतरींची ज्योति प्रकाशली दीप्ति । मुळींची जे होती आच्छादिली ॥ '; ' शीतळ साउली आमुची माऊली । विठाई बोळली प्रेमपान्हा ॥ ' – प्रेमानंदाला पूर येऊन त्यांत तुकाराम स्वच्छंदानें पोहूं लागले. देहबुद्धीचा, देहात्म-भावाचा निरास झाला; जीवशिवाचें ऐक्य झालें. ' जिकडे पाहें तिकडे उभा । अवघ्या गगनाचा गाभा ॥ जेथें देखें तेथें तुझींच पाऊलें । विश्व अवघें कोंदाटलें ॥' ' तान्हें तान्ह प्याली । भूक भूकेनें खादली । वास वासनेसी नाही । मन पांगुळलें पायीं ॥' असा पूर्ण अद्वैताचा, सर्वात्मभावाचा साक्षात्कार झाला.

साक्षात्कारापर्यंत आत्मविकासाच्या या सर्व अवस्थां-मध्यें अध्यात्ममार्गाचें मानसशास्त्र आहे, भक्तिदर्शना-चें नीतिशास्त्र आहे. सर्व अनुभवाच्या बोलांमध्यें अप्रतिम काव्याचा विलास आहे. साधकाप्रमाणें सत्प्रवृत्त रसिकहि या आध्यात्मिक चरित्राच्या लेखकास मनःपूर्वक धन्यवाद देईल.

— य. र. आगाशे



अनुक्रमणिका
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## 'नवभारत' निधि

# विनंति

सात वर्षांपूर्वी भारताच्या स्वातंत्र्ययुगास प्रारंभ झाल्याबरोबर श्री. शंकरराव देव यांच्या संचालकत्वाखालीं 'नवभारत' मासिकाच्या प्रकाशनास प्रारंभ झाला. त्यामागील मुख्य उद्देश असा कीं स्वतंत्र भारतास व त्याचा घटक असलेल्या महाराष्ट्रास नव्या वैचारिक चळवळीची आवश्यकता असल्यामुळें त्या चळवळीचें एक साधन म्हणून 'नवभारत' मासिकाचा उपयोग व्हावा. नवे नवे प्रयोग जीवनाच्या सर्व प्रकारच्या क्षेत्रांत व्हावयास पाहिजेत. त्याशिवाय भारतास व त्याचा घटक असलेल्या महाराष्ट्रास नवजीवन प्राप्त होणार नाहीं. नवे प्रयोग करण्याचें साहस नव्या विचारांच्या उन्मेषाशिवाय निपजत नाहीं. वैचारिक स्वातंत्र्याच्या वातावरणांतच वैचारिक चळवळ वाढीस लागते. कोणत्याहि संप्रदायाचें विशिष्ट बंधन स्वीकारलें तर सत्याच्या अनेक बाजू मनुष्याच्या विचारचक्षूसमोर येत नाहींत. विरोधी संप्रदायांच्या वा पक्षांच्या वा भिन्न विचारसरणींच्या लोकांमध्यें एक प्रकारची स्पर्धा, द्वेष वा मत्सर या भावना असूं शकतात. अशा भावना परस्परांमधील सामाजिक संबंधहि बिघडवून टाकतात. विवेकबुद्धि व सत्यसंशोधनप्रवृत्ति यांना त्यामुळें कमी अवसर लाभतो. म्हणून भिन्न भिन्न संप्रदाय, भिन्न भिन्न तत्त्वज्ञानें, परस्परविरोधी ध्येयवाद व विचारसरणी बाळगणाऱ्या सर्व विचारवंतांना, साहित्यिकांना व पंडितांना आपले विचार उच्च पातळीवरून सत्यसंशोधनाच्या उद्देशानें मांडण्याची संधि मिळावी व प्रेरणा व्हावी असें धोरण 'नवभारत' मासिकाच्या संचालकांनीं व संपादकांनीं स्वीकारलें. या धोरणाच्या मुळाशीं विचारवंतांत विचारमूलक वैरभावना मावळावी व वैचारिक सहकार्य निर्माण व्हावें हा हेतु आहे.

गेल्या सात वर्षांत 'नवभारत' मासिकाच्या कारकीर्दीचा आढावा घेतल्यास हें दिसून येईल कीं वरील धोरण पूर्णपणें पाळलें गेलें आहे. राजकारणांत व अर्थशास्त्रांत, समाजवादी, साम्यवादी, राष्ट्रवादी, हिंदुत्ववादी, मानवतावादी व सर्वोदयवादी या सर्वांनीं 'नवभारतां'त आपले विचार प्रकट केले आहेत. तत्त्वज्ञान व धर्म या विषयांसंबंधींसुद्धां परस्परविरोधी विचारांना, जडवाद, भौतिकवाद, संशयवाद, साक्षात्कारवाद, ईश्वरवाद किंवा अध्यात्मवाद अशा विविधविचारसरणींना 'नवभारता'नें अवसर दिला आहे. 'नवभारता'नें प्रसंगविशेषांना अनुरूप असे विशेषांक काढून अत्यंत नमुनेदार व संग्राह्य असा विचारसंग्रह अशा निमित्तानें प्रसिद्ध केला आहे. उदाहरणार्थ, आचार्य-जावडेकर-विशेषांक, तत्त्वज्ञान-विशेषांक, लोकशाही-विशेषांक, मानवेन्द्रनाथ रॉय-विशेषांक हे या गोष्टीची साक्ष देतील. एकाच विषयाच्या विविध वा विरुद्ध बाजू वाचकांच्या पुढें याव्या म्हणून अनेक मूलगामी प्रश्नांवर भिन्न भिन्न लेखकांचे एकाच विषयावरील लेखहि वारंवार प्रसिद्ध केले आहेत. उदा०, गीता, गीतारहस्य यासंबंधीं नवभारतांतील चर्चा या दृष्टीनें चिरस्मरणीय ठरेल. याशिवाय ललित साहित्याच्या क्षेत्रांत, सुप्रसिद्ध चिनी साहित्यिक लिन युटांग यांच्या एका सुंदर कादंबरीचा अनुवाद 'पंकज', आणि सुप्रसिद्ध कन्नड साहित्यिक टी. पी. कैलासम् यांच्या एका वैशिष्ट्यपूर्ण नाटकाचा अनुवाद 'प्रयोजन' हीं 'नवभारता'नें विशेषांकांच्या द्वारें सादर केलेलीं वाचकांस आठवत असतील.

'नवभारत' मासिक हें अशा प्रकारें एका विशिष्ट उच्च नैतिक व वैचारिक पातळीवरून चालविलें जात आहे. त्याचा ग्राहकवर्ग हा परिमित राहिला आहे. त्यामुळें संचालकांना फार झीज सोसावी लागली आहे. श्री. शंकरराव देव यांनीं पहिलीं सहा वर्षें सर्व प्रकारची आर्थिक जबाबदारी स्वतःच्या अंगावर घेऊन 'नवभारत' चालविलें. त्यानंतर श्री. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनीं आपल्या मित्रांचें साहाय्य घेऊन गेलें वर्ष 'नवभारत' मासिक चालविण्यास हातभार लावला.

परंतु अशा प्रकारचें मासिक नजीकच्या काळांत केवळ वाचकवर्गाच्या साहाय्यानें आर्थिक दृष्ट्या स्वयंपूर्ण होईल अशी आशा करतां येत नाहीं. कारण, उच्च विचारांची गोडी असलेला वाचकवर्गच महाराष्ट्रांत लहान आहे. सार्वत्रिक शिक्षणाचा प्रसार होईपर्यंत



अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अशीच स्थिति राहणार आहे.

महाराष्ट्राच्या सर्वांगीण विकासाच्या दृष्टीनें सर्व महाराष्ट्रीय विचारवंत आणि सांस्कृतिक कार्यकर्ते एकत्र येऊन विचारविनिमय करतील आणि आपापसांत कटुता निर्माण होऊं देणार नाहींत यासाठीं 'नवभारता'-सारख्या वैचारिक व्यासपीठाची फार मोठी आवश्यकता आहे असें आम्हांस वाटतें. येत्या दहापंधरा वर्षांच्या काळांत आर्थिक, शैक्षणिक आणि सामाजिक क्षेत्रांत संपूर्ण महाराष्ट्रास विशेष प्रगतिकारक कार्य करावयाचें आहे. त्यासाठीं महाराष्ट्रांतील सर्व विचारधारांचें सहिष्णुतेनें संकलन झालें पाहिजे. 'नवभारत' मासिकाच्या आजपर्यंतच्या कामगिरीवरून हें कार्य या मासिकाच्या द्वारें महाराष्ट्रांत होऊं शकेल अशी आम्हांस उमेद वाटते. म्हणून अजून दहा वर्षे तरी महाराष्ट्रानें 'नवभारत' मासिक जगविलें पाहिजे असें आमचें मत आहे. त्याकरितां डिसेंबर १९५५ च्या अखेर पयत किमान पन्नास हजार रुपयांचा निधि गोळा करण्याचा संकल्प करण्यांत आला आहे. म्हणून आमची अशी प्रार्थना आहे कीं हितचिंतकांनीं या निधीस शक्त्यनुरूप सढळपणें साहाय्य करावें. शक्य तों प्रत्येकीं निदान शंभर रुपये देऊन या निधीस साहाय्य द्यावें; अशी देणगी देणारास 'नवभारत' मासिक दहा वर्षें मिळत राहील. वरील संकल्पाच्या सिद्धीसाठीं महाराष्ट्रांतील आणि महाराष्ट्राबाहेरील सर्व मराठीप्रेमी आम्हांस सक्रिय सहकार्य देतील अशी दृढ आशा आहे.

'नवभारत' निधि जमविण्याकरितां पुढील समिति नेमली आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (अध्यक्ष); न्या. मू. भवानीशंकर नियोगी, श्री. देवकीनंदन नारायण, आचार्य स. ज. भागवत, श्री. बाबुराव जगताप, स्वामी रामानंदतीर्थ, प्रा. गोवर्धन पारीख, प्रा. म. अ. चान्सरकर, श्री. वि. म. वेडेकर, श्री. कृ. ना. फडके, श्री. मा. प. मंगुडकर (कार्यवाह). आणखी सभासद नियुक्त करून घ्यावयचा समितीला अधिकार आहे. 'नवभारत' निधि समितीचें कार्यालय C/o 'नवभारत' मासिक ९०६ शिवाजीनगर, पुणें ४ येथें राहील.

**१ जानेवारी १९५५.**

---

धों. के. कर्वे, पुणें
(डॉ.) मु. रा. जयकर, पुणें
मा. श्री. अणे, पुणें
स्वामी केवलानंदसरस्वती, वाई
स्वामी कुवलयानंद, लोणावळें
बाळ गंगाधर खेर, मुंबई
(न्या. मू.) वा. रा. पुराणिक, नागपूर
ना. म. जोशी, मुंबई
द. वा. पोतदार, पुणें
के. ल. दप्तरी, नागपूर
ध. रा. गाडगीळ, पुणें
रामराव देशमुख, अमरावती
मालोजीराव नाईक-निंबाळकर, मुंबई
केशवराव जेधे, पुणें
द. का. कुंटे, मुंबई
गो. स. सरदेसाई, कामशेत
ना. गो. चापेकर, बदलापूर
न. वि. गाडगीळ, पुणें
भा. सा. हिरे, मुंबई
माधवराव बागल, कोल्हापूर
यशवंतराव चव्हाण, मुंबई
श्रीकृष्णदास जाजू, वर्धा
विठ्ठलराव घाटे, पुणें
(म. म.) वा. वि. मिराशी, नागपूर
वि. के. जोग, पुणें
न. र. फाटक, मुंबई
अ. का. प्रियोळकर, मुंबई
दिगंबरराव बिंदु, हैदराबाद
वि. वि. द्रविड, इंदूर
(डॉ.) ना. गो. नांदापूरकर, हैदराबाद
पुनमचंद रांका, नागपूर
(बॅ.) वा. शि. बारलिंगे, नागपूर
लालचंद हिराचंद, मुंबई
शं. द. उरसळ, पुणें
शां. म. डहाणुकर, मुंबई
शं. वा. दांडेकर, पुणें
दा. वि. गोखले, पुणें
वि. स. खांडेकर, कोल्हापूर
(डॉ.) य. खु. देशपांडे, यवतमाळ
ग. त्र्यं. माडखोलकर, नागपूर
मो. वा. दोंदे, मुंबई
दि. धों. कर्वे, पुणें









अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## नवभारत निधि

प्र. के. अत्रे, मुंबई
पु. दि. ढवळे, नागपूर
ज. श्री. टिळक, पुणें
बाळासाहेब मोरे, पंढरपूर
श्री. शं. नवरे, मुंबई
स. वा. कोगेकर, पुणें
दिनकरशास्त्री कानडे, बुलढाणा
इरावती कर्वे
वा. ल. कुलकर्णी, मुंबई
श्री. गो. हुल्याळकर, पुणें
द. रा. धारपुरे, मुंबई
ग. स. अळतेकर, कऱ्हाड
( डॉ. ) त्रिं. रा. नरवणे, मुंबई
( डॉ. ) वा. चिं. लागू, पुणें
प्रभाकर पाध्ये, मुंबई
प्र. रा. दामले, पुणें
काकासाहेब तांबे, मुंबई
प्रभाकरपंत कोरगांवकर, कोल्हापूर
गो. ह. देशपांडे, नाशिक
ग. रा. दळवी, मुंबई
( प्रा. ) सुरेन्द्र बारलिंगे, नांदेड
एस्. एम्. जोशी, पुणें
पु. य. देशपांडे, नागपूर
ना. ग. गोरे, पुणें
ग. गं. जांभेकर, पुणें
अ. वि. टिळक, धुळें
पु. ह. पटवर्धन, पुणें
डॉ. का. बा. चिंदरकर, सोलापूर
र. के. खाडिलकर, पुणें
वसंत बापट, मुंबई
बा. रं. सुंठणकर, बेळगांव
प्रमिला दाणी, नागपूर
( डॉ. ) वा. वि. आठल्ये, सातारा
जे. पी. नाईक, कोल्हापूर



अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

प्रा ज्ञ पा ठ शा ळा म ण्ड ळ — ग्र न्थ प्र का श न

# वैदिक संस्कृतीचा विकास

लेखक— तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी,

वैदिक संस्कृतीचें विकसित रूप म्हणजेच आजची भारतीय संस्कृति होय. भारतीय संस्कृतीच्या जन्मापासून आतांपर्यंत झालेल्या स्वरूपाचें वर्णन या पुस्तकांत प्राधान्यानें केलें आहे. वैदिक संस्कृतीच्या अभ्यासकास अत्यंत उपयोगी आणि मराठी भार्षेतील अत्यंत अप्रतिम अशा प्रकारचें हें पुस्तक आहे.

किंमत ६ रु.

प्रकाशक :— व्यवस्थापक प्राज्ञपाठशाळामंडळ
वाई ( जि० उ. सातारा )


   


## पांढरें कोड

नष्ट झालेल्या हजारों गांवच्या लोकांचीं प्रशस्तीपत्रें व बक्षिसें पूर्ण पत्त्यासहित छापलेलीं पत्रकें मोफत मागवा.
औषधाची किं. रुपये ५ पोष्ट खर्च १ रुपया निराळा पडेल.

वैद्य के. आर्. बोरकर
मु. पो. मंगरूळपीर जि. अकोला (म. प्र.)



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## आपल्या ग्रंथालयासाठीं आमचें उत्कृष्ट प्रकाशन

१ सत्याचे प्रयोग अथवा आत्मकथा (चतुर्थावृत्ति) : म. गांधी ९-०-०
२ हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें व पुनर्घटना (द्वितीयावृत्ति) : डॉ. राधाकृष्णन् २-८-०
३ उपनिषदांतील दहा गोष्टी (चतुर्थावृत्ति) : शंकरराव देव ०-१२-०
४ फिलिपाइन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास — त्र्यं. र. देवगिरीकर १-४-०
५ पं. जवाहरलाल नेहरू : आत्मचरित्र (द्वितीयावृत्ति) १२-८-०
६ विश्राम (षष्ठावृत्ति) : साने गुरुजी १-४-०
७ भारतीय संस्कृति (षष्ठावृत्ति) — साने गुरुजी [illegible]-०-०
८ आधुनिक भारत (द्वितीयावृत्ति) — आचार्य जावडेकर १२-८-०
९ हिमालयांतील प्रवास (तृतीयावृत्ति) — काका कालेलकर २-८-०
१० गांधीजींचें विविध दर्शन (द्वितीयावृत्ति) संकलनकार : डॉ. राधाकृष्णन् २-८-०
११ जिवंत व्रतोत्सव (द्वितीयावृत्ति) — काका कालेलकर ३-१२-०
१२ सत्याग्रही महाराष्ट्र : प्रेमा कंटक ३-०-०
१३ अर्थशास्त्र कीं अनर्थशास्त्र ? (द्वितीयावृत्ति) : जॉन रस्किन २-०-०
१४ जीवन-दर्शन (चतुर्थावृत्ति) — महाकवि खलिल जिब्रान २-८-०
१५ संस्कृतीचें भवितव्य (द्वितीयावृत्ति) — डॉ. राधाकृष्णन् १-४-०
१६ महात्मा गौतम बुद्ध (द्वितीयावृत्ति) — डॉ. राधाकृष्णन् १-४-०
१७ जीवन आणि साहित्य : आचार्य भागवत २-८-०
१८ प्राचीन साहित्य (द्वितीयावृत्ति) — कविसम्राट् रवींद्रनाथ ठाकुर १-८-०
१९ संयम कीं स्वैराचार ? (खंड २ रा) — म. गांधी १-१२-०
२० हिंदु-मुसलमान-ऐक्य : आ. जावडेकर ३-०-०
२१ गीता-हृदय (चतुर्थावृत्ति) : साने गुरुजी १-०-०
२२ हिंदूचें समाजकारण : काका कालेलकर २-४-०
२३ द्विखंड हिंदुस्थान : डॉ. राजेंद्रप्रसाद ११-०-०
२४ कॉंग्रेस-कथा (द्वितीयावृत्ति) — गो. आ. देशपांडे ४-८-०
२५ भगवान् बुद्धासाठीं : शंकरराव देव ३-८-०
२६ आ. कृपलानी : निवडक लेख व भाषणें ३-०-०
२७ वाल्मीकि-आश्रमांतील प्रवचनें — आचार्य जावडेकर १-०-०
२८ संपूर्ण स्वदेशी : म. गांधी २-४-०
२९ प्रवासी : महाकवि खलिल जिब्रान २-०-०
३० ज्ञानेश्वरी-अंतरंग : डॉ. रा. द. रानडे २-८-०
३१ गांधीजींचें मानस : म. गांधी ४-०-०
३२ दिल्ली डायरी : म. गांधी-साने गुरुजी ६-०-०
३३ मानवजातीची कथा — डॉ. हेन्री थॉमस-साने गुरुजी ८-०-०
३४ भारतीय राष्ट्रवादाचा विकास : — प्रा. न. र. फाटक ४-८-०
३५ पैगंबराचा बगीचा : खलिल जिब्रान १-८-९
३६ यंत्राची मर्यादा : नरहरिभाई परीख २-८-०
३७ जवाहरलाल नेहरू : (संक्षिप्त आत्मकथा) १-६-०
३८ माझी नृत्यसाधना : रोहिणी भाटे ५-०-०
३९ विश्वमानव : ना. ग. जोशी २-४-०
४० उपनिषत्सार : शंकरराव देव ३-०-०
४१ आपल्या गणराज्याची घडण — दादा धर्माधिकारी ३-८-०
४२ जागतिक इतिहासाचें ओझरतें दर्शन : (खंड १ व २) : पं. जवाहरलाल नेहरू १५-०-०
४३ हिरे आणि हिरकण्या : खलिल जिब्रान १-८-०
४४ प्रयोजन : कैलासम् १-८-०
४५ पुरोगामी साहित्य : आचार्य जावडेकर २-०-०
४६ महाराष्ट्र व हिंदी राजकारण ,, ,, १-०-०
४७ समाईक सहकारी स्वराज्य : ,, ,, ०-४-०
४८ लो. टिळक व म. गांधी ,, ,, २-०-०
४९ विनोबाजी भावे : साने गुरुजी १-०-०
५० पत्री : साने गुरुजी ३-८-०
५१ दैवी संपत् चरित्रमाला : पुष्प १ लें १-०-०
५२ दैवी संपत् चरित्रमाला : पुष्प २ रें १-०-०

सर्व प्रकारच्या पुस्तकांकरितां प्रथम आमच्याकडे चौकशी करा

**सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला : टिळक रोड, पुणें २**


अनुक्रमणिका


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

‘नवभारत’ मासिकाचा

# ‘भूदान’ विशेषांक

श्री. शंकरराव देव यांच्या ६० व्या वाढदिवसाच्या निमित्तानें
२८ जानेवारी १९५५ रोजीं

## प्रसिद्ध होईल

श्री. जयप्रकाश नारायण, श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे, श्री. वैकुंठलाल मेहता
श्री. रा. कृ. पाटील, आचार्य जावडेकर, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी,
श्री. एस्. एम्. जोशी, श्री. ना. ग. गोरे, श्री. र. के. खाडिलकर
प्रा. पारीख, श्री. पु. ह. पटवर्धन, श्री. वसंतराव
नारगोळकर, श्री. भाऊ धर्माधिकारी, प्रा. दे.
अ. दाभोलकर श्री. दि. के. बेडेकर,
प्रा. दे. ज. हातेकर
इत्यादींचे लेख

**आगाऊ मागणी करा.**

किरकोळ अंकास २ रु. ] [ वर्गणीदारांस वर्गणीच्या रकमेंतच

व्यवस्थापक, ‘नवभारत मासिक.’
वाई ( जि० उ. सातारा )

# नवमानवतावाद

२६ जानेवारी १९५५ रोजी प्रसिद्ध होईल.

ले. एम्. एन्. रॉय

अनुवादक- प्रा. गोवर्धन पारीख प्रस्तावना:- श्री. लक्ष्मणशास्त्री जोशी

विशेष माहितीसाठी लिहा

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई जि. सातारा

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे
संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई